# संगीत कानसेन

## भारतीय शास्त्रीय संगीताचा कानमंत्र


संकल्पना  व लेखन :

सुनिल सामंत

मांडणी व सजावट :

अमृता ढगे

तांत्रिक सहाय्य

आनंद माने



प्रकाशन :

**ई साहित्य प्रतिष्ठान**

जी ११०२, इटर्निटी

ठाणे, 400604

www.esahity.com





संपर्क :

esahity@gmail.com

sangeet.kansen@gmail.com

9869674820

# अनुक्रमणिका

**प्रस्तावना**

**सुनिल सामंत**

संगीत शिकावं लागतं असं मला लहानपणी वाटलंच नव्हतं कधी. गाणं काय ... असंच येतं. जरासं बोलता यायला लागलं की गाणं म्हणता यायला लागतं. आई.. रेडियो टिव्ही सिनेमा ... असं ऐकता ऐकता गाणं आपण कधी म्हणायला लागतो ते कळतच नाही. गाण्याच्या भेंड्या लावताना, प्रवासात, आंघोळ करताना, सिनेमा बघून बाहेर येताना आपण गुणगुणतो आणि गाणं म्हणायला लागतो. आपल्या आजुबाजूला सगळी मुलं , माणसं गाणं म्हणतात.



मग कळलं की गाण्याचे क्लासेस असतात. गुरू असतात. गाणं म्हणायला शिकावं लागतं. गाण्याचं शास्त्र असतं. शास्त्रीय संगीत नांवाचा शब्द ऐकला. मग एकदा ते शास्त्रीय संगीत ऐकलं. अगदी एका मोठ्या गायकाची बैठक ऐकली. अजिबात आवडलं नाही. पण लोक एवढं लक्ष देऊन काय ऐकताहेत हे कळेना. ते कुतूहल घेऊन बाहेर पडलो.

मग थोडं मोठं झाल्यावर पुन्हा पुन्हा शास्त्रीय संगीताच्या बैठकींना जायला लागलो. SPICMACAY (Society for Promotion of Indian Classical Music And Culture Amongst Youth) नांवाच्या एका संस्थेशी योगायोगाने गाठ पडली. आणि श्रीमंत होत गेलो. त्यावेळी रेडियोवर शास्त्रीय संगीताच्या मैफ़ली असत. त्याही ऐकल्या. हळू

हळू मजा यायला लागली. रेडियोवर संगीत सरिता नावाचा एक कार्यक्रम असे. त्यात रागांची माहिती आणि त्या त्या रागावर आधारित गाणी लावत. ही रागांशी पहिली दोस्ती. म्हणजे आपली रोजची सिनेमातली गाणी रागांवर आधारित असतात हे कळताच एक नवीनच आनंद झाला! मजा आ गया ! काळाच्या ओघात शास्त्रीय संगीत शिकलो. अतिशय चांगले गुरू मिळाले. मित्र मिळाले. पुस्तकंही मिळाली. ते तर गुरू आणि मित्र. एक एक नवनवीन आनंदाचा अनुभव मिळत गेला. हा आनंद प्रचंड होता..अतुलनीय होता. गाणं येण्याचा नव्हे. गाणं ऐकण्याचा. एक एक मैफ़ल म्हणजे माझ्या आयुष्यातले सर्वोत्तम क्षण आहेत.



खजिना. सुखाच्या परमावधी. नंतरच्या काळात कॅसेट, सीडी, नेट असं शास्त्रीय संगीत ऐकत राहिलो. त्या त्या वेळी जगातलं सगळं सुख समोर हात जोडून उभं असायचं. त्याचबरोबर सिनेसंगीत, भावगीतं, नाट्यगीतं वगैरे ऐकण्यात एक प्रकारची एक्स्ट्रा मजा यायला लागली. गझल, वाद्यसंगीत, अगदी छोटे छोटे संगीताचे तुकडेही अधिक सुख द्यायला लागले. त्याचबरोबर हे संगीत न आवडणाऱ्यांबद्दल आश्चर्य वाटायला लागलं. इतकं सुंदर संगीत , स्वर्गसुख... यांना का नाही आवडत ? (एके काळी मलाही ते आवडत नसे याची आठवण होतीच) . एकट्याने आनंद घेण्यात मजा नाही येत यार. तो शेअर करायला, त्यावर चर्चा करून त्याची उजळणी केली की आनंद द्विगुणित होतो. अनुभूती मिळते. पण सगळेजण काही गाण्याच्या क्लासला जाऊ शकत नाहीत. तिथे गायला शिकवतात. पण ऐकायला कोणीच शिकवत नाही. तेव्हा वाटलं ...मुळात गाणं कसं ऐकावं याचे वर्ग का असू नयेत ? आणि मग वाटलं, गाणं ऐकावं

कसं हे आपणच का शेअर करू नये ? जसजसा अधिकाधिक विचार करत गेलो तेव्हा लक्षात आलं की शास्त्रीय संगीताबद्दलचे अनेक गैरसमज आहेत. ते नुसते दूर केले की बाकीचं काम अगदी सोप्पं आहे. बस्स.



मित्रांनो. या सत्रांमध्ये फ़क्त एवढंच करणार आहे. गैरसमज दूर करणं. असे गैरसमज जे खूप खोलवर रुजलेले आहेत. केवळ संगीतच नव्हे तर सर्वच अभिजात कलांबद्दल. चित्रांबद्दल. नृत्याबद्दल. काव्याबद्दल. जसा सिनेमा नाटक जाऊन बघता येतं तसं हे नसतं. याच्यासाठी काहितरी खास अभिजन असावं लागतं हा गैरसमज. असे काही गैरसमज दूर करायचे आहेत. हे करताना मी इंटरनेटचा मुक्तहस्ते वापर करणार आहे. नेटवरच्या अनेक ब्लॉगवरची माहिती आणि गाण्याच्या लिंक्स वापरणार आहे. किंबहुना हे केवळ इंटर्नेट मुळेच शक्य होत आहे. ही माहिती उपलब्ध करून देणाऱ्या त्या ज्ञात अज्ञात ज्ञानी लोकांचे आधी आभार मानतो. जिथे शक्य तिथे त्यांच्या नावांचा उल्लेख केलेला आहे.

## गैरसमज क्रमांक एक :

शास्त्रीय संगीताला इंग्रजीत काय म्हणतात ? सांगा बरं ! बरोब्बर ! क्लासीकल म्युझीक. अगदी हिंदीत सुद्धा मैं क्लासिकल म्युझीक सुन रहा हूं असंच म्हणतात. हा झाला पहिला सगळयात मॊठ्ठा चुकीचा गैरसमज. शास्त्रीय म्हणजे सायंटिफ़िक. शास्त्र म्हणजे सायन्स. मग शास्त्रीय संगीताला क्लासिकल म्युझिक का म्हणावं ? तर पाश्चात्य लोक त्याला क्लासिकल म्हणतात म्हणून. पण पाश्चात्य क्लासिकल संगीत आणि भारतीय शास्त्रीय संगीत यांच्यात खूप फ़रक आहे. क्लासिकल संगीताला अभिजात संगीत म्हणावं. ते भारतात आहेच. पण शास्त्रीय संगीत म्हणजे सायन्स आणि संगीत यांचा मिलाफ़ आहे. हे भारतात हजारो वर्षं केलेल्या शास्त्रीय अभ्यासाचं फ़लित आहे. पाश्चात्य अभिजात संगीताचा भर हा चायकोव्हस्की, बाख, बिथोव्हन यांच्या कलात्म जिनीयसवर आहे. आतून आलेल्या संगीतावर आहे. भारतीय संगीत “आतून” येत नाही असं नाही. पण भारतीयांना सगळयाचं शास्त्र करण्याची सवय. त्यातून त्यांनी “काम” पण सोडला नाही. कामशास्त्र बनवलं. आयुर्वेद बनवला. ग्रहताऱ्यांचं ज्योतिःशास्त्र बनवलं. योग बनवला. तेव्हा ऋग्वेद सामवेदापासून ते आता आताच्या अशोक रानडेंसारख्या संगीतज्ञांपर्यंत लोकांनी प्रयोग करकरून संगीताचं शास्त्र बनवलं.



अभिजात संगीत आणि शास्त्रीय संगीत यातला मुख्य फ़रक म्हणजे प्रयोगशीलता. अभिजात म्हणजे अभिजनांनी अभिजनांसाठी निर्माण केलेलं संगीत. इथे निर्मिकाच्या प्रतिभेवर भर असतो. पण शास्त्र म्हणजे केवळ प्रतिभेच्या आधारावर रहात नाही. जेव्हा एखाद्या गोष्टीचं शास्त्र असतं तेव्हा मग observation, analysis, classification, experiments, results, अशा चक्रातून प्रगती होत जाते. तशा प्रगतीला भारतीय शास्त्रीय संगीतात प्रचंड वाव आहे. त्यामुळे भारतीय शास्त्रीय संगीतात जितकं अभिजातत्व आहे तितकंच नाविन्यही आहे. तुम्ही तानसेनाला ए आर रेहमानचा ड्रेस घालून ऐकू शकता. त्या प्रयोगातलं चांगलं वाईट याचं पृथक्करण करू शकता. त्यामुळेच शास्त्रीय संगीताची प्रत्येक बैठक युनिक असते. एकच राग शंभरजण शंभर तऱ्हांनी पेश करतात. आणि गायकाची प्रत्येक बैठक ही त्या त्या गायकासाठीही युनिक असते. तो तस्साच्या तस्सा रिपीट परफ़ॉर्मन्स इतर ठिकाणी देत नाही. प्रत्येक बैठकीत काही ना काही नवीन भर पडते आणि आधीच्या प्रयोगातल्या हीणाला कात्री लागते. मात्र काय भर घालायची आणि काय कापायचं हे त्या spur of moment चं डिसिजन नसतं. तर त्यामागे विचार, प्लान, लिखित नोंद, रियाझ आणि बैठकीतल्या इतरांशी त्याचं विचार विनिमय केलेलं असतं. तयारीने हे करायचं असतं.




तात्पर्य : शास्त्रीय संगीत हे क्लासिकल तर आहेच, पण महत्त्वाचं म्हणजे ते सायंटिफ़िक आहे.

यानंतर मग प्रश्न येतो तो वेगळाच. आपण शास्त्रीय रसायन म्हणत नाही. शास्त्रीय जीव म्हणत नाही. शास्त्रीय भौतीक म्हणत नाही. शास्त्रीय मन म्हणत नाही. मानसशास्त्र, जीवशास्त्र, भौतिक शास्त्र असं म्हणतो. मग शास्त्रीय संगीत हा शब्द कुठून आला ? मानस आपलं काम करतं. जीव आपलं काम करतात. ते समजून घेण्याचं काम आपण त्यांच्या त्या त्या शास्त्रांनी करतो. न्युटनने शोध लावण्यापुर्वी गुरुत्त्वाकर्षण होतंच की! न्युटनने नियमांचा शोध लावला म्हणून सफ़रचंद पडायला लागली असं नाही झालं. त्याने शोधलं ते शास्त्र. या नियमांचा वापर करून लोकांनी यंत्रं बनवली . ते म्हणजे तंत्रज्ञान. न्युटनच्या आधी धनुर्विद्या होती. आणि धनुर्विद्या किंवा भालाफ़ेक यांसाठी गुरुत्वाकर्षणाच्या पॅराबोलाच्या सिद्धांत लागू होतो. अजाणतेपणी लोक हे नियम वापरत होतेच. शास्त्रातून तंत्रज्ञान जन्माला येतं. तंत्रज्ञानाचा अर्थ शास्त्राने लागतो. शास्त्राच्या आधाराने तंत्रज्ञान विकास पावतं. तंत्रज्ञानातून कारागिरी येते.



कला आणि कारागिरी या गोष्टी वेगळया. कला आणि कारागिरी यांचा जवळचा संबंध आहे. मुर्तीकला अंगात असली आणि जर चिकणमाती कशी बनवावी हे ठाऊक नसलं तर मुर्ती घडवता येणार नाही. चित्रकला अंगात असली आणि रंग कसे वापरावेत, ब्रश, चारकोल, स्पॅच्युला यांचा वापर कसा करावा, ऑईलचे गुणधर्म आणि वॉटर कलरचे गुणधर्म यांची माहिती नसली तर अंगातल्या कलेचा काय उपयोग ? कले बरोबरच अकलेचा वापर करता यायला हवा. ही अक्कल म्हणजे कारागिरी---तंत्रज्ञान--- शास्त्र. तंत्रज्ञानाच्या मागे असतं ते विज्ञान किंवा शास्त्र. मात्र शास्त्र, तंत्र आणि कारागिरी शिकता येतात तशी कला , प्रतिभेच्या आधाराशिवाय शिकता येत नाही. कला ही देन

आहे. आपली (आपल्या अंगातली) कला ओळखता येणं ही तर फ़ारच मोठी देन आहे.

चित्र काढणाऱ्याला कले बरोबरच अकलेची गरज असते. पण चित्र बघणाऱ्याला काय ? तो चित्र बघून ""हे आवडलं ते नावडलं " असं म्हणू शकतो. लहान मूल एखादी गोष्ट आवडली की मिटक्या मारतं आणि नावडली की थुंकून टाकतं. त्यात काय काय घातलंय वगैरे विचारत बसत नाही. बाळाला अंगाई आणि गोंगाट यातला फ़रक कळतो. मग ऐकण्यासाठी शास्त्र माहित असण्याची गरज काय ?



हा सगळा विचारांचा गोंधळ माझ्या मनात झाला आणि मग मी जे वाचन, आणि चिंतन केलं त्यातून जे लक्षात आलं ते असं : संगीत हे शास्त्रावर आधारित आहे. संगीताच्या निर्मितीसाठी संगीतकाराला , अगदी लावणी बनवतानाही संगीत शास्त्राची माहिती असायलाच हवी. असतेच. तेव्हा सगळंच संगीत हे संगीत शास्त्रातूनच जन्माला येतं. पण ज्या संगीतात शब्दांपेक्षा सूरांना अधिक महत्त्व दिलं जातं त्याला सर्वसाधारणपणे शास्त्रीय संगीत म्हटलं जातं. ख्याल, ध्रुपद हे शास्त्रीय संगीतात मोडतात. ठुमरी, नाट्यगीत, टप्पा, चैती, होरी इत्यादी उपशास्त्रीय संगीतात येतात. तर भावगीत, सिनेसंगीत, लावणी, पोवाडा, कीर्तन (हे सर्व शास्त्रावर आधारित असूनही) शास्त्रीय संगीतात मोडले जात नाहीत. कारण त्यांत स्वरांपेक्षा जास्त लक्ष शब्दांवर असतं. हे सगळे प्रकार सोयीसाठी आहेत. आपल्या अभ्यासात आणि संगीताचा आस्वाद घेताना या भेदांना थोडं बाजूलाच ठेवलेलं बरं.

आपण शास्त्रीय संगीताची समज वाढवताना संगीत शास्त्राच्या अभ्यासाबरोबरच सिने आणि नाट्य संगीतही ऐकणार आहोत.

## गैरसमज क्रमांक दोन : स्वर किती ?

हा काय प्रश्न झाला ? स्वर सात असतात. शेंबडं पोर सुद्धा सांगेल.

मग पेटीला एवढी बटणं का ? की बोर्ड एवढा मोठा का ? एवढी मोठी वीणा कशासाठी ? गीटारला एवढ्या तारा का ? बेसूर होतं म्हणजे नक्की काय होतं ?

शेंबड्या पोराचं काय ? त्याला विचारलं रंग किती तर ते काय सांगेल ? सप्त रंग. तांबडा, नारिंगी, पिवळा, हिरवा, निळा, पारवा, जांभळा. बरोबर ना ? पण खरे रंग किती. अनगिनत. असंख्य. एकट्या हिरव्या रंगाच्या लाखभर छटा मिळतील की.



तांबडा आणि नारिंगी यांच्या मधल्या शेकडो शेड्स सापडतील.

एखाद्याला विचारलं चवी किती ? तर तो सांगेल सात किंवा आठ चवी. गोड, तिखट, कडू, आंबट, खारट, तुरट वगैरे. पण चवी अनंत आहेत. अगदी उसाचा रस, गूळ, आणि साखर हे एकाच वस्तूपासून बन्लेले असूनही त्यांच्या चवी वेगवेगळया आहेत. एक आंबा घेतला तरी त्यात अनंत चवी आहेत. अगदी झाडागणिक आंब्याची चव बदलते. आणि त्याच त्या आंब्याची चव दिवसागणिक बदलते.

तसे स्वरसुद्ध असंख्य आहेत.  स्वर म्हणजे कंपनसंख्या. (frequency : vibrations per second). ही हट्‌र्झ मध्ये मोजतात. सुमारे २० ते २०००० हर्टझ हा मानवी श्रवण क्षमतेची रेंज आहे. २० हट्‌र्झ म्हणजे अगदी फुसफुस कुजबुजणेच समजा. तर २०००० म्हणजे किंचाळी.  श्रीक. कुकार. आपलं साधं बोलणं हे ३००-५०० हर्टझ च्या मध्ये असतं. आणि संगीत (कंठसंगीत) २०० ते १००० च्या रेंज मध्ये.  बासरी किंवा शिटी मध्ये खूप वरच्या रेंजचा समावेश होईल तर ढोल , ऑर्गन, बँडमधले मोठ्ठे बास वगैरे २०० पेक्षाही खालची रेंज पकडतात.



दुसरं म्हणजे २०० आणि २०१ या रेंजमध्ये २००.१, २००. २, २००.३५ असेही स्वर असणार. म्हणजे ऐकू येऊ शकतील असे लाखो स्वर असतात.

थोडक्यात सांगायचं तर स्वर सात नाहीत. स्वर अनंत असतात.

वेदांच्या काळात या स्वरांवर खुप अभ्यास झाला. सामवेद तर जवळ जवळ स्वर आणि श्रुतींचा अभ्यासच म्हणता येईल. कारण ऋग्वेदातल्या ऋचा या कशाही म्हटल्या तरी देव प्रसन्न होत नसत. तर यज्ञाच्या वेळी ऋचा म्हणण्याची विशिष्ट सांगितीक पद्धतीच वापरायची होती. त्याला जाती गायन म्हणत. ते आपण नंतर बघूच. त्या काळात त्यांनी श्रुती शोधल्या. श्रुती म्हणजे काय ? तर जे दोन स्वर सामान्य मानवी कानाने वेगवेगळे ऐकू येतील आणि जे स्वर कानांना सुंदर वाटतील असे स्वर.

उदाहरण द्यायचं तर हिरवा रंग घेऊ. हिरव्याच्या हजार छटा असतील. पण आपण अगदी सहज ओळखू आणि सौंदर्यपूर्ण दिसतील अशा म्हणजे गडद हिरवा, हिरवा, पोपटी, वगैरे.

तर अशा २२ श्रुती मानल्या गेल्या. त्यांची नांवं खालील प्रमाणे

| क्र | नांव |
|---|---|
| १ | तीव्रा |
| २ | कुमुद्वती |
| ३ | मंदा |
| ४ | छंदोवती |
| ५ | दयावती |
| ६ | रंजनी |
| ७ | रतिका |
| ८ | रौद्री |
| ९ | क्रोधा |
| १० | वज्रिका |
| ११ | प्रसारिणी |
| १२ | प्रिती |
| १३ | मार्जिनी |
| १४ | क्षिती |
| १५ | रक्ता |
| १६ | संदीपनी |
| १७ | अलापिनी |
| १८ | मदंती |
| १९ | रोहिणी |
| २० | रम्या |
| २१ | उग्रा |
| २२ | क्षोभिणी |

साधारण १० हट्‌र्झ वर एक श्रुती धरली तर एक श्रुती मंडल २२० श्रुतींचे बनेल. आणि मानवी कानांना आनंद देणाऱ्या २०० ते ९०० हट्‌र्झ मध्ये अशी साडेतीन श्रुती मंडलं बसतील. ज्याला आताच्या काळात सप्तक म्हणतात तशी साडेतीन सप्तकं. चांगले तयारीचे गायक तीन सप्तकांत फ़िरू शकतात. महंमद रफ़ी साडेतीन सप्तकांत गायचे असं म्हणतात.



सर्वसाधारण हार्मोनियमवर तीन किंवा साडेतीन सप्तकं असतात.

हजारो वर्षं ही श्रुतीपद्धती चालत आली. वैदिक काळात (बहुधा नारदीय संगीतातून) जन्माला आलेली ही श्रुती पद्धती कालांतराने अधिकाधिक परफ़ेक्ट होत चालली आहे. मध्ययुगातल्या भरत, अहोबल, श्रीनिवास,रामामात्य , पुंडरिक आदी संगीतशास्त्रज्ञांनी सुमारे ४०० वर्षं यांवर अभ्यास करत यांतून बारास्वरांचं जे सध्याचं सप्तक आहे ते बनवलं. व या स्वरांना नवीन नांवं दिली. त्यांचा shortform म्हणजे सा रे ग म प ध नी. हे नवीन स्वर म्हणजे जुन्या स्वरांतूनच काही निवडक स्वर आहेत. जास्त खोलात न शिरता मी डायरेक्ट सध्याच्या पद्धतीवर येतो.

| क्र | नांव | नवीन नांव | short |
|---|---|---|---|
| १ | तीव्रा | षड्ज | सा |
| २ | कुमुद्वती | | |
| ३ | मंदा | | |
| ४ | छंदोवती | | |
| ५ | दयावती | ऋषभ | रे |
| ६ | रंजनी | | |
| ७ | रतिका | | |
| ८ | रौद्री | गांधार | ग |
| ९ | क्रोधा | | |
| १० | वज्रिका | मध्यम | म |
| ११ | प्रसारिणी | | |
| १२ | प्रिती | | |
| १३ | मार्जिनी | | |
| १४ | क्षिती | पंचम | प |
| १५ | रक्ता | | |
| १६ | संदीपनी | | |
| १७ | अलापिनी | | |
| १८ | मदंती | धैवत | ध |
| १९ | रोहिणी | | |
| २० | रम्या | | |
| २१ | उग्रा | निषाद | नि |
| २२ | क्षोभिणी | | |

या सर्व श्रुती ..आणि स्वर यांना षड्जाच्या स्थानापासून मोजलं जातं. म्हणजे :

षड्ज जर २०० असेल तर ऋषभ २२५, मध्यम २६६.६६ असे येणार.

षड्ज जर २४० असेल तर ऋषभ २७०, मध्यम ३२० असे येणार. म्हणजे षड्ज बदलला तर बाकीचे सारेच स्वर बदलतात.

प्रत्येक गायकाचा षड्ज स्थीर मानला जातो. आणि त्यानुसार इतर स्वरांचं अंतर ठरतं

सा : षड्ज : १ मानला तर

रे : ऋषभ : ९/८ किंवा १.१२५ पट

ग : गांधार : ५/४ किंवा १.२५ पट

म : मध्यम : ४/३ किंवा १.३३३

प : पंचम : ३/२ किंवा १.५ पट

ध : धैवत : ५/३ किंवा १.६६ पट

नि : निषाद : १५/८ किंवा १.८७५ पट

आणि वरचा षड्ज ( तार सप्तक) पहिल्या षडजाच्या दुप्पट असतो.

म्हणजे असं की

सा : षड्ज : २४० हर्टझमानला तर

रे : ऋषभ : २७० हर्टझ

ग : गांधार : ३०० हर्टझ

म : मध्यम : ३२० हर्टझ

प : पंचम : ३६० हर्टझ

ध : धैवत : ४०० हर्टझ

नि : निषाद : ४५० हर्टझ

तार सप्तकातला सा : ४८० हर्टझ

हा जो हिशोब आहे तो स्वरांच्या रंजकतेसाठी आहे. म्हणजे जर गाणे सुरेल व्हायचे असेल तर सूर या प्रमाणात लागल्यास कानाला गोड लागतात असे प्रयोगांनी सिद्ध झाले आहे. शास्त्र आणि कला यांचा संगम म्हणतात तो हा. सूर नीट लागला नाही हे कानांनी कळतं. जसं जेवणात मीठ बरोबर झालंय की नाही हे जिभेने कळतं.

वरच्या कोष्टकात आपण जे पाहिलं ते सात स्वरांमध्ये बरीच मोकळी जागा सुटते. त्यातून अजून पाच स्वर जन्माला आले. सा आणि रे यांच्या गॅपमध्ये कोमल रे आला. रे आणि ग मध्ये कोमल ग आला. म आणि प च्या मध्ये तीव्र म आला. प आणि ध च्या मध्ये कोमल ध आला. ध आणि नी च्या मध्ये कोमल नी आला. अशा प्रकारे शुद्ध सात, कोमल चार आणि तीव्र एक असे बारा स्वर तयार झाले. आजच्या सर्व संगीतात हे बारा स्वर वापरले जातात. अगदी पाश्चात्य संगीतातही. या शिवाय काही गायक काही रागांमध्ये अतिकोमल स्वरांचा वापर करतात. हे आपण नंतर पाहूच.



गैरसमज क्रमांक तीन

अबब ! हे सगळं लक्षात असेल तरच संगीत ऐकता येतं. ते समजायला फ़ारच कठीण असतं. ते राग, ते ताल, ते प्रकार . आपल्या डोक्यात हे सगळं बसणार नाही.

अजिबात नाही.  शास्त्रीय संगीत समजायला कठीण असतं हा मोठ्ठा गैरसमज आहे. मी पुर्वी चायनीज हॉटेलमध्ये जायला घाबरत असे. कारण म्हणे तिथे काड्यांनी खावं लागतं. सिनेमात तसं बघितलं होतं. मग कळलं. चमच्याने किंवा अगदी हाताने खाल्लं तरी काही होत नाही. अगदी हेच संगीताबद्दल आहे. कार्यक्रमात काही कोणी श्रुती , स्वर वगैरेंची चर्चा करत नाही. जसं चायनीज हॉटेलमध्ये गेल्यावर आपण एखादी वस्तू मागवतो. त्यात आलं, लसूण, कांदा मिरची हे किती आणि कसं घातलंय याची काहिही माहिती नसली तरी आपण चव आवडली तर खाऊ शकतो. तसंच हे आहे.  आणि जसं खाण्याचीही चव डेव्हलप करावी लागते , तसं गाण्याचीही चव डेव्हलप करावीच लागते. एक विशिष्ट तऱ्हेचं गाणं ऐकत राहिलं की हळू हळू ऐकावंसं वाटतं. तसं तर मायकल जॅकसनचे जितके दिवाने आहेत तितकेच त्याचं गाणं म्हणजे धांगडधिंगाणा असं म्हणणारेही आहेतच की.
दुसरी गोष्ट ही की प्रत्येक खाण्याची वस्तू आपण कधीतरी पहिल्यांदाच ट्राय करतो. तसं शास्त्रीय संगीत एकदा पहिलं ट्राय करावंच लागणार. एखाद्या मोठ्या गायकाचं किंवा वादकाचं गाणं आधी एकदा सीडी वर घरी ऐकून पहावं. मग एखादी बैठक किंवा कार्यक्रम अटेंड करावा. मग

दुसरी. असं करत वारंवार कानावर ते संगीत पडत राहिलं की आपोआपच चव निर्माण होत जाईल.

ज्यात प्रचंड प्रमाणात शास्त्र गुंतलेलं आहे अशी दुसरी एक कला म्हणजे म्हणजे सिनेमा. त्यात अनेक शास्त्रं आणि अनेक कला गुंतलेल्या आहेत. कॅमेऱ्याच्या कोनापासून ते पार्श्वसंगीताच्या अचानक होणाऱ्या मौनापर्यंत अनेक गोष्टींचा इफ़ेक्ट आपल्यावर जाणीवपुर्वक केला जात असतो. आणि आपण अजाणता त्यातला आनंद घेत असतो. अगदी तश्शीच स्टोरी आणि तितकेच भारी नट नटी असूनही एखादा सिनेमा सुपरहिट होतो तर दुसरा सुपरफ़्लॉप. त्यात असंख्य गोष्टींचा हात असतो. हे संपूर्ण टेक्निक समजून घेतलं तर सिनेमा बघायलाही मज्जा येते. पण नाही कळलं म्हणून फ़ार काही बिघडत नाही. तंत्राचा वाराही न लागता आपण सिनेमा एंजॉय करू शकतो. बघून बघून हळू हळू कळतंच.




मात्र एक गोष्ट महत्त्वाची आहेच. शास्त्रीय संगीत ( किंवा कोणतीही कला) हे केवळ ऐकून ऐकून आवडण्याने भागणार नाही. त्यात खोलात खोल खोल शिरायला वाव आहे. त्यात "समज" डेव्हलप करता येते. याचं कारण हे की या गाण्यासाठी , या बैठकीसाठी त्या गायकाने , वादकाने आधी प्रचंड तयारी केलेली असते. त्यामुळे एखादं खास मेहनत घेऊन बनवलेलं खाद्य व्यंजन जसं चव घेत घेत खावं अशी अपेक्षा असते, तशीच मेहनत, रियाझ आणि घराण्याच्या परंपरेतून तयार झालेलं संगीत ऐकणाऱ्याने तेवढीच तयारी करून यावं आणि "कान" देऊन ऐकावं अशी गायकाची इच्छा अपेक्षा असते. त्यामुळे मैफ़लीत पहिल्या रांगेत कोण कोण बसलंय हे बघूनच

अनेकदा गायकाची कळी खुलते. हे गुरू लोक आपल्या चुकांची नोंद करणार याबरोबरच आपल्या नवीन प्रयोगाची नोंद घेणार आणि त्यावर आपलं मत जागेवरच देणार याची खात्री त्याला किंवा तिला असते. प्रत्यक्ष कार्यक्रम सुरू झाल्यावर श्रोते जर सुजाण असतील आणि योग्य जागांवर दाद देत असतील तर गायकालाही मजा येत जाते. त्याचं गाणं फ़ुलत जातं. मैफ़ल जिवंत होते. त्यामुळेच तर प्रत्येक मैफ़ल हा एक स्वतंत्र प्रयोग असतो.



एकदा समज डेव्हलप झाली की सगळंच संगीत जास्त मजेने घेता येतं. ज्याला समजत नाही त्याला कुठल्याच संगीतात काहीच समजत नाही. मायकेल जॅकसनचं पण नाही. आणि एकदा संगीतातलं समजायला लागलं की सगळंच संगीत सारखंच समजतं. मग लोकसंगीतातली मजाही जाणवते. सिने संगीतातल्या “जागा” समजायला लागतात. आणि शास्त्रीय संगीतात मजा काय आहे आणि त्याला एक वरचं स्थान का आहे तेही जाणवायला लागतं. एखाद्याची विद्वत्ता जाणवायला आपण थोडं तरी शिकलेलं असायला हवं ना ! हे सर्वच क्षेत्रांना लागू होतं.

शास्त्रीय संगीत म्हणजे जगण्याचा एक मार्ग आहे. याचा अर्थ दिवसभर खूप संगीत ऐकत रहावं असं वगैरे नाही. पण जगातलं जे जे उत्तम आहे त्याचा आस्वाद घेण्याचा निर्णय आपणच करावा लागतो. म्हणजे जेवायचं ते पोट भरायला की अन्नाचा आनंद घ्यायला? फ़िरायचं ते कुठे तरी

पोहोचण्यासाठी की प्रवासातला आनंद घ्यायला? काम करायचं ते पाट्या टाकत की त्यात मजा घ्यायची ? लोकांना भेटायचं ते नाईलाज म्हणून की भॆटीचा आनंद घ्यायचा? वाचन करायचं ते परिक्षेसाठी नाईलाज म्हणून की ज्ञानाचा आनंद घेण्यासाठी? मुळात मिळाली थोडीशी वर्षं जगायचं ते नाईलाज म्हणून की त्यातला खोलवरचा  आनंद घ्यायचा म्हणून.... हा प्रश्न आहे. आपल्याला सर्वांनाच एक अगदी छॊटा काळ जगायला मिळाला आहे. त्यातला प्रत्येक क्षणाचा आस्वाद घ्यायचा तर जगण्याची जाण हवी. शास्त्रीय संगीत हा एक भाग आहे. शास्त्रीय संगीत किंवा संगीताचं शास्त्र समजल्यावर आनंदाचा एक मार्ग खुला होतो. तो व्यक्तिगत आहे. त्याची तुलना mounteneering शी होऊ शकते. वेड्यावाकड्या अजस्त्र भयावह कड्याकपारींतून जीव धोक्यात घालून फ़िरणाऱ्यांना इतरजन वेडेच समजणार. पण त्यांना स्वतःला काय आनंद मिळतो ते तोच किंवा तीच जाणे. इतरांना ते कायम कोडंच राहतं.




अजून एक. संगीत जर पेय मानलं तर शास्त्रीय संगीत हे व्हिस्की मानू शकता. दहा मिंटांचा ब्रेक मिळाला की एक कोल्डड्रींक पिऊ शकता. बुटाची लेस बांधता बांधता किंवा मिटींगमध्ये चर्चा करता करता चहा पिऊ शकता. तसंच पॉप संगीत, सिने संगीत, भावगीतं इकडे तिकडे काम करता करता ऐकू शकता. पण शास्त्रीय संगीत म्हणजे उंची वाईन. ते असं जाता जाता ऐकायची गोष्ट नाही. बैठकीला जाताना मस्त अत्तर बित्तर लावावं. शरीराबरोबरच मनालाही. सगळे जळमट विचार बाहेरच ठेवावेत. तीन चार तास , आयुष्यातले काहीतरी छान जमवायला चाललो

आहोत अशा तयारीने घेऊन जावेत. नंतरही लगेच कसली अपॉईंटमेंट ठेवू नये. मी माझा एक अनुभव सांगतो. जेव्हा संगीत थोडं थोडं कळू आलं तेव्हाची पहिली मैफ़ल. पंडित हरिप्रसाद चौरसिया आणि झाकिर हुसेन यांची. तेव्हाच्या काळी मोठ्या कॅसेट नव्हत्या. हरिप्रसादजींचं जास्तीत जास्त १५ मिनिटांचं वादन टेप, रेडियोवर ऐकलेलं होतं. त्यामुळे हे अख्खे तीन तास फ़क्त बासरी कशी काय वाजवणार याची उत्सुकता होती. कामावरून उशीरा सुटल्यावर तसाच थकलेला गेलो. मित्राकडे जाऊन शर्ट तेवढा बदलला. आपल्याला काय ऐकायला मिळणार याची आणि ते कितपत समजेल, पचेल, आवडेल, झेपेल याची अजिबात कल्पना नव्हती.

पण...जे घडलं ते कल्पनेच्या बाहेर होतं. चार तास हरिप्रसादजी आणि झाकिर हुसेननी सुमारे तीन चारशेंच्या दर्दी गर्दीचा कत्ले आमच केला. तेव्हा तर तिसरा कोणी साथीलाही नसे. फ़क्त दोन जादूगार. चार तास एखाद्या मंत्रवलेल्या स्थितीत गेले. झिंग. नशा. प्रचंड भारावलेल्या अवस्थेत रात्री दिडच्या सुमारास आम्ही तिघे ( माझा मित्र आणि त्याचा एक मित्र) बाहेर आलो. आणि रस्त्याच्या कडेला एका कट्ट्यावर तीन चार तास बसून राहिलो. जवळपास मुक्यानेच. समोरच्या रिक्षा स्टॅंडवरचा चहा आजही जिभेवर रेंगाळतोय. दुसरा दिवस रवीवार होता. तोही अर्ध्या ग्लानीत अर्ध्या बेखुदीतच गेला. नंतरचा पूर्ण आठवडा तरंगत होतो. आज... तीसेक वर्षांनंतरही मी ती मैफ़ल जगत असतो. तीच नव्हे, तेव्हा पासूनची प्रत्येक मैफ़ल हा माझ्या जगण्यातला एक खास अनुभव झाला आहे.

माझ्या वाचकांना , जगातल्या प्रत्येकाला , येणाऱ्या सर्व पिढ्यांना ही दारू प्यायचा एक तरी अनुभव यायला हवा.

--------------------

# परिशिष्ट :

*[ या इथे मला इंटरनेटवर सापडलेलं आणि आवडलेलं काही लिखाण देत आहे. इंटरनेट, ब्लॉग्स, मायबोली, मनोगत, मिसळ पाव अशा वेबसाईट्स, मनसेची वेबसाईट अशा ठिकाणी प्रचंड मोठ्या प्रमाणात शास्त्रीय संगीताबद्दल लिहीलेलं लिखाण सापडतं. अनेकदा लेखकाचा पत्ता लागत नाही. जिथे शक्य तिथे लेखकांचा उल्लेख केला आहे. कोणाला लेखकाबद्दल अधिक माहिती मिळाल्यास कळवावे.*

*यातली काही मतं अत्यंत टोकाची वाटण्याची आणि न पटण्याची शक्यता आहे. पण ती विचार करायला लावणारी आहेत. त्यामुळे त्यांचा समावेश केला आहे. ]*

## धनश्री राय यांच्या व्याख्यानाबद्दल :

**धनंजय**

एका मित्राने पाठवलं म्हणून धनश्री राय-पंडित यांचं हे व्याख्यान ऐकलं. भारतीय शास्त्रीय संगीताबद्दल तरुण पिढीत जो दुरावा निर्माण होतो त्याची वेगवेगळी कारणे देण्यात येतात. त्यात भारतीय संगीतात तांत्रिक गोष्टी जास्त आहेत म्हणून ते कदाचित समजावून घायला अवघड जातं असंही एक कारण मानलं जातं. या बाईंनी शास्त्रीय संगीतातील राग समजावून घ्यायला काही उपाय सुचवलाय. तो उपाय ऐकून (आणि मुख्यत: त्यामागचा विचार जाणून) मला काही गोष्टी सुचल्या. या लेखातील फक्त दुसरा मुद्दा वर उल्लेखलेल्या व्याख्यानाशी संबंधित आहे. बाकीचे त्या अनुषंगाने सुचलेले विचार.

या आधीही मी शास्त्रीय संगीतातील बदलत्या trends वर लिहिलं होतं. माझे काही समज थोडे अजून व्यापक झाले आहेत असे मला वाटते. त्यामुळे हा लेख लिहायची इच्छा झाली.

१. आक्षेप: भारतीय संगीताचा आत्मा हरवतो आहे - उत्तर : भारतीय संगीत हे जणू काही "दैवी संगीत" आहे आणि त्यामुळे त्यात बदल करण्यात येऊ नयेत असा काही मंडळींचा सूर असतो. नावं घ्यायची गरज नाहीये पण अगदी उत्तम, प्रथितयश आणि मला ज्या कलाकारांबद्दल व्यक्तिश: प्रचंड आदर आहे त्यांच्याकडून हे ऐकल्यावर मात्र हे कलाकार आपल्यापुढे अपूर्ण चित्र उभं करत आहेत असं मला वाटलं.




ख्याल संगीताबद्दलच बोलायचं तर ते जास्तीत जास्त ५०० वर्ष जुने आहे. त्याआधी (त्याला समांतरही) धृपद संगीत होते. त्याचा संदर्भ फार तर तिथून अजून ५००-१००० वर्षे मागे जाईल. लोकसंगीताचा संदर्भ अजून ३-४ हजार वर्षे पर्यंत जाईल. (हे सगळे आकडे अंदाजे टाकतो आहे, माझा मुद्दा मांडण्यात अचूक आकडे फारसे महत्त्वाचे नाहीत). शेतीचा उदयच जिथे २० हजार वर्षापूर्वीपर्यंत झाला नव्हता आणि संस्कृतीचा उदय ४००००/५०००० वर्षापूर्वीपर्यंत झाला नव्हता तिथे शास्त्रीय संगीत हे जणू काही दैवी आहे आणि त्यात बदल होणे शक्यच नाही ही भूमिका मला तरी हास्यास्पद वाटते. आर डी बर्मन सारख्या संगीताला ७० च्या काळातल्या लोकांनी नाके मुरडलेली असणारच. त्यामुळे आज जे (भारतीय ) संगीत आहे ते जणूकाही फारच उथळ आहे असे सरसकट मानणे चुकीचे आहे.

२. भारतीय संगीताचे oversimplification : भारतीय रागसंगीत समजण्यास अवघड आहे असे माझे मत आहे. पण ते गाणे enjoy करण्यासाठी ते समजले पाहिजे असे कुठे आहे? त्यामुळे गाणे ऐकणे आणि ते समजणे या दोन पूर्णपणे वेगळ्या गोष्टी आहेत. या आधीही याबद्दल एक लेख लिहिला आहे त्यामुळे जास्त खोलात जात नाही.




पण enjoy करण्यासाठी गाण्याच्या तांत्रिक बाजू समजण्याची गरज नाही याचा अर्थ तांत्रिक बाजू सोप्या आहेत असे मुळीच नाही. तांत्रिक बाजू समजावून घायला मेहनत घ्यावी लागते हे नि:संशय खरे आहे. त्यामुळे गाण्यातल्या तांत्रिक बाजू समजणे सोपे आहे असे oversimplification मात्र कृपया करू नये.

३. बदलते जीवनमान आणि संगीताचा संबंध : जिथे जीवनमान अस्थिर झाले आहे, लोकांचा उथळपणा वाढतो आहे, भोगवादी प्रवृत्ती वाढते आहे व तिला खतपाणी घालण्यास सर्व घटक तत्परतेने आपली भूमिका बजावत आहेत, तिथे संगीत किंवा कला या गोष्टींवर याचा परिणाम होणार नाही असे शक्य नाही. अगदी अपरिहार्यपणे तो होणार. पण परिणाम संगीतापेक्षा फार मोठ्या गोष्टीवर पडतो आहे आणि ती म्हणजे जीवनमूल्ये.

आजच्या (माझ्या) पिढीत किती लोक passionately काहीतरी करताना दिसतात? ते खेळ, कला, वाचन, ट्रेकिंग यासारखा काहीही असू शकतं. weekend ला timepass म्हणून करणं वेगळं आणि एखाद्या गोष्टीची प्रचंड आवड (passion) असल्यामुळे ती गोष्ट करणं वेगळं. या आधीच्या या post चा रोख या उथळपणावर टीका करणे हाच होता. करमणूक म्हणून काही करूच नये एवढी अतार्किक भूमिका मी घेणार नाही. माझा आक्षेप आहे ते सर्व काही करमणूक म्हणून बघण्याला.




त्यामुळे जर काही हरवत असेलच तर ते भारतीय संगीत एवढंच हरवत नाहीये पण passion /संवेदनशीलता यासारखी महत्वाची मूल्ये हरवत आहेत. भारतीय संगीत बिघडत नाही असं मला म्हणायचं नाही. ते बदलत आहे, त्यातले काही बदल मला रुचत नाहीत. एक श्रोता म्हणून होत असणारे उथळ बदल मला नक्कीच टोचतात, त्रास देतात. पण या पूर्ण बदलांकडे वस्तुनिष्ठ पद्धतीने बघण्यात यावं असं मला वाटतं.

---अमृतवर्षिणी या ब्लॉगवरून (धनंजय)

# गाणं ऐकणं :

**धनंजय**

मला गाणं गुणगुणण्याची सवय आहे. अगदी शास्त्रीय संगीत ते 'अटरिया पे लूटन कबुतर रे' किंवा 'बिडी जलाय ले' इथपर्यंतची गाणी मी गुणगुणत असतो. अर्थात शास्त्रीय किंवा दर्जेदार (जुने मराठी/ हिंदी, नाट्यसंगीत, गझल) संगीतच जास्त ऐकत असल्यामुळे तेच जास्त वेळेस गातो हा भाग वेगळा. सांगायचा मुळ मुद्दा असा की गाणे गाताना/गुणगुणताना कुणी नवीन माणूस आजुबाजुला असेल तर तो/ती हमखास विचारतातच - 'तू गाणं शिकलेला आहेस काय' किंवा 'तू गाणं गातोस वाटतं'. मग मी त्यांना उत्तर देतो की - ' मी गायक नाही. शास्त्रीय संगीताची थोडीशी ओळख आहे. मी मुळात एक पूर्णवेळ श्रोता (dedicated listener) आहे'. त्यावर हमखास थोडासा प्रश्नार्थक चेहरा किंवा 'विचीत्रच असतात लोक! ' असे expression उत्तर म्हणून मिळतात. याचं कारण बऱ्याच लोकांसाठी गाणे ऐकणे हा एक timepass किंवा करमणुक असते. त्यामुळे dedicated listening म्हणजे काय ते सांगावसं वाटलं.

माझ्या मते गाणे ऐकणे (किंवा अजून generalization करुन, कुठल्याही कलेचा आस्वाद घेणे) या गोष्टीचे दोन modes आहेत. एक आहे आनंदासाठी ऐकणं. ज्यामध्ये एकमेव निकष असा आहे की ते गाणं ऐकून 'छान' वाटलं पाहिजे. जसं एखादं फूल पाहून छान वाटतं, किंवा पावसात भिजून छान वाटतं, किंवा लहान मुलाचं हसणं बघून छान वाटतं. अशा वेळी आपण या आनंदाच्या कारणांची मीमांसा करत बसत नाही

(काहीजण करतही असतील, करो बिचारे!), फक्त त्या गोष्टीचा आनंद घेतो. दुसरी गोष्ट आहे विश्लेषणात्मक आनंद (analytical pleasure) - ज्यामध्ये एखाद्या कलाप्रकाराची घडण कशी होत गेली आहे किंवा तो कलाप्रकार घडवतानाची कलाकाराची thought process समजावून घेणे.अर्थात प्रत्येक वेळेस ऐकताना analytical mode मधे ऐकणे माझ्यासाठी अशक्य गोष्ट आहे.



सुरूवातीला शास्त्रीय संगीत ऐकताना मला वाद्यसंगीत खूप आवडायचं आणि कंठसंगीत तेवढंसं आवडायचं नाही. जसजसं शास्त्रीय संगीत जास्त ऐकत गेलो, तसतसं कंठसंगीतातही रुची वाढु लागली. मग हळुहळू रागांच्या सुरावटी ओळखीच्या झाल्या. कुठल्यातरी चित्रपटसंगीतातल्या गाण्यात वापरलेला राग, भावसंगीतात वापरलेला राग ओळखू यायला लागला. काही रागांसाठी स्वतःचे अमूर्त models तयार झाले. मग हळुहळू बाकीच्या तांत्रिक बाबींशी ओळख होत गेली. मग एखादा रागाच्या अंतरंगात डोकवायची सवय लागली. एखादा राग आपल्याला समजतोय असं वाटावं आणि लगेच असा काही performance/recording ऐकण्यात यावा की आधीच्या सगळ्या findings चा पुन्हा विचार करण्याची गरज भासावी असं बऱ्याच वेळेस होतं.

शास्त्रीय संगीतात अनवट राग असा एक प्रकार आहे. जर राग त्याच्या अवघड रचनेमुळे समजण्यास सोपा नसेल आणि त्याचमुळे तो जास्त गायला जात नसेल तर त्याला अनवट राग म्हणतात. *(टीप: अनवट म्हणजे*

*दोन रागांचे मिश्रण करून तयार झालेला राग: सुनिल सामंत)* माझी अनवट रागाची व्याख्या जो राग मला समजत नाही तो अनवट अशी आहे. तर अशा अनवट रागांचा अभ्यास हा एक आनंदाचा मोठाच ठेवा आहे. याशिवाय घराणा पद्धतींचे गायन आणि त्यातील सौंदर्य, एकाच घराण्याचे दोन गायक, तसेच गुरू शिष्य यांच्या गायनातील साम्यस्थळे आणि फरक, एखाद्या गायकाची शैली, जोड तसाच मिश्र रागांची घडण आणि त्यातील त्या रागाच्या / बंदिशीच्या रचनाकर्त्याला अभिप्रेत असलेला सौंदर्यविचार या सगळ्या गोष्टी अगणित आनंदाचा ठेवा आहेत. कधीकधी वर सांगितलेल्या बऱ्याच गोष्टींची उलगड लवकर होत नाही. मग त्यावर विचार करत असताना कधीतरी अचानक साक्षात्कार झाल्यासारख्या काही गोष्टी स्पष्ट होतात त्यावेळेसचा आनंद तर केवळ शब्दात न सांगता येण्यासारखा. त्याचबरोबर हे कुणाला सांगता येत नसेल तर होणारे थोडेसे दुःखही त्याचाच भाग.



हे सगळे होत असताना आपल्या स्वतःच्या (सर्वार्थाने) लहानपणाची होणारी जाणीव आणि या कलेची भव्यता आयुष्यविषयक funde ही शिकवून जातात. मला तर अत्युच्च आनंदाच्या आणि दुःखाच्या प्रसंगी गाण्यामुळे जी मदत झालीय त्यामुळे मी या कलाकारांच्या आणि संगीताच्या न फिटल्या जाणाऱ्या ऋणात बांधला गेलोय.

---धनंजय

## संगीत शास्त्र आणि ऐकणं :

**धनंजय**

शास्त्रीय संगीत ऐकण्याबद्दलचा एक फार मोठा गैरसमज म्हणजे ते ऐकण्यासाठी गाण्याचं शास्त्र समजावं लागते. आधीच्या post मध्ये गाणं ऐकण्याचे analytical mode आणि pleasure mode असे दोन modes सांगितले होते. याचाच दुसरा अर्थ आहे की गाणं कुठल्या mode मध्ये ऐकायचं हा सर्वस्वी तुमचा choice आहे. त्यात उच्चनीच असं काही नाही. शेवटी शास्त्रीय संगीतातील शास्त्र म्हणजे तरी काय आहे?




जेव्हाकेव्हा शास्त्रीय संगीतातील शास्त्र तयार झालं नव्हतं (किंवा जेव्हा फक्त लोकसंगीत अस्तित्वात होतं) , तेव्हाच्या संगीतकारांना संगीतातील काही गोष्टींना, काही नियमांना किंवा काही आकृतीबंधांना (patterns) मूर्तरूप (formal models) द्यावंसं वाटंलं. ते त्यांनी राग किंवा तत्सम संज्ञांच्या (स्वर, कोमल/तीव्र/शुद्ध स्वर, आरोह, अवरोह, इ.) स्वरूपात मांडलं. (काळाच्या रेषेवर) त्यानंतरच्या संगीतकारांनी तीच मूर्तरूपं वापरणं चालू ठेवलं. याचं अगदी साधं कारण म्हणजे ती models बऱ्यापैकी परिपक्व होती/होत गेली आणि त्यांना आधी formalize केलेल्या गोष्टी पुन्हा formalize करण्यात वेळ दवडण्यापेक्षा

( re-inventing the wheel) संगीतातील काही दुसऱ्या गोष्टींवर (नवीन राग, गाण्याच्या नवीन शैली, इ.) लक्ष केंद्रित करावंसं वाटलं. त्यामुळे तीच formal models पुढे वापरण्यात येत गेली आणि विकसत गेली. आता, ज्या लोकांना ही models समजून घेण्यापेक्षा स्वतःची अमूर्त रुपं वापरायची (abstract models) आहेत ते ती खुशाल वापरू शकतात. श्रवणाच्या आनंदाचा गाण्याच्या तांत्रिक बाबींशी संबंध नाही तो याच कारणासाठी. त्यामुळे



पारंपारिक चालत आलेले formal models असू द्या किंवा स्वतः develop केलेले अमूर्त models असू द्यात, त्यामुळे श्रवणाच्या आनंदात बाधा यायचं मुळीच कारण नाही. उदाहरणार्थ, भूपाचे स्वर ऐकल्यावर एखाद्याला भूप राग व त्यातील शास्त्र समजेल तर दुसऱ्या कोणाला त्यातलं शास्त्र समजून न घेताही स्वतःच्या भावभावनांशी link करता येईल (जो की गाण्याचा एक हेतू आहे). पुलंनी एका ठिकाणी म्हटल्याप्रमाणे शास्त्रीय संगीत म्हणजे फक्त त्या रागातील स्वरांच्या रचना (permutations) नव्हेत तर त्यातील भाव जास्त महत्त्वाचा आहे. म्हणूनच जे लोक गाण्यातील फक्त गणित किंवा शास्त्र बघतात ते लोकच ऐकण्यासाठी गाणं "समजलं" पाहिजे या गोष्टीचा पुरस्कार करतात.

--- धनंजय (रसिका ब्लॉगवरून)

## गाणं ऐकण्याच्या स्टेजेस :

**धनंजय**

मागच्या पोस्ट मधे गाणे ऐकण्याच्या modes बद्दल लिहीले होते. तसेच माझ्यामते गाणे ऐकण्याच्या तीन stages/ पायऱ्या आहेत. पहिली पायरी - गाणं आवडणं आणि त्यातील technicalities न कळता/माहीत



नसतानाही गाण्यातला भाव तुमच्यापर्यंत पोचणे.उदाहरणार्थ गीतरामायणाचे संगीत हे पूर्णपणे रागसंगीतावर आधारलेले आहे. पण गीतरामायण ऐकताना त्यातील technicalities समजून घ्यायची मुळीच गरज भासत नाही. दुसरे उदाहरण म्हणून किशोरी आमोणकरांची 'सहेला रे' ही बंदिश घेऊ या. त्यातील राग भूप आहे की भूपाचा variant आहे हे समजून घेण्याची गरज भासत नाही. त्याशिवायही तो enjoy करता येतो.

दुसरी पायरी - गाण्याच्या तांत्रिक बाबी समजून गाणे enjoy करणे. यामध्ये मी analytical pleasure मध्ये सांगितलेल्या बहुतेक बाबी येतात. शास्त्रीय संगीत ऐकणाऱ्या / समजणाऱ्या काही व्यक्ती या तांत्रिक बाबींमुळे शास्त्रीय संगीतच सर्वश्रेष्ठ आहे असे मानू लागतात. इथे शास्त्रीय संगीत great नाही असे मला म्हणावयाचे नाही. शास्त्रीय संगीतासाठी


MS 5263
Veyagana, Book of chants of the liturgical Kauthuma Samhita of the Samaveda. India, 1672

लागणारी साधना आणि बुद्धिमत्ता ही सोपी गोष्ट नाही. पण त्यामुळे शास्त्रीय संगीतच सर्वात श्रेष्ठ आणि बाकीचे संगीत कमी दर्जाचे हा विचार मला मान्य नाही. सांगायचा मुद्दा हा की तांत्रिक बाबी कळू लागल्या की त्यातच गुंतून पडून त्यातील गाणे ऐकणे किंवा गाणे enjoy करणे हे बाजूला पडून फक्त तांत्रिक बाबींची चिरफाड करत राहणे हा धोका आहे.

तिसरी पायरी - ही सर्वात वरची आणि अवघड पायरी. गाण्याच्या तांत्रिक बाबी माहीत असूनही तांत्रिक बाबींवर लक्ष केंद्रित न होऊ देता त्यातील भाव या गोष्टीवर लक्ष केंद्रित करणे. या पायरीवर पोचल्यावर शास्त्रीय / अशास्त्रीय / उपशास्त्रीय हा भेदच मुळी राहत नाही. उरते ते फक्त शुद्ध गाणे. ही पायरीच मुळी वेगळी आहे. आधी गाण्याचा वापर आनंद घेण्यासाठी होत असतो. यामध्ये तो स्वतःचा शोध किंवा तत्सम तत्त्वज्ञानाशी निगडीत विचारांसाठी माध्यम म्हणून होतो. सूर, ताल, लय ही बंधने असूनही ती गळून पडतात. मला वाटतं इथे पोचणारे लोक हे एका अर्थाने योगाची साधना करत असतात आणि ही पायरी म्हणजे त्या साधनेचे फळ आहे. संगीताच्या व्याख्येत असलेला नादब्रम्ह या शब्दाचा अर्थ इथे कदाचित उलगडत असेल. इथे श्रोता किंवा गायक यापैकी कुठल्या भूमिकेत साधक आहे याने फारसा फरक पडत असेल असे मला वाटत नाही.



या ठिकाणी मला कबीराची आठवण होते. मंगेश पाडगावकरांनी त्यांच्या कबीर या पुस्तकाच्या प्रस्तावनेत कबीराच्या कवितेच्या अवस्था सांगितल्या आहेत. त्यात कबीराच्या सुरुवातीच्या रचना या 'मला चांगलं बनायचंय' किंवा 'मला वाईट गोष्टींपासून दूर रहायचंय' या भावनेशी साधर्म्य सांगणाऱ्या आहेत (उदाहरणार्थ - माया महा ठगनी हम जानी, हिरना समझ बूझ). पण त्याच्या नंतरच्या/शेवटीच्या काळातल्या रचना या परमतत्वाचा साक्षात्कार झाल्यानंतरच्या म्हणजेच आप/ पर असं काही नाहीच, ज्यापासून पळून जायचंय असं काहीच नाही, ज्याला अंगीकृत करायचंय असंही काही नाही अशा स्वरूपाच्या आहेत . या रचनेचे एक उदाहरण म्हणून 'साधो सहज समाधी भली' ही कविता बघता येईल. तर गाणं ऐकणे किंवा शिकणे यामधली तिसरी पायरीची तुलना याच्याशी करता येईल.

वरील उताऱ्याची ( तिसरी पायरी) अवस्था लहान तोंडी मोठा घास अशी झालीय. पण जे वाटत गेलं तसं ते लिहीत गेलो.



**नादवेड (नादवेध ची प्रस्तावना) :**

**--अच्युत गोडबोले**



गाण्याविषयी मला लहानपणापासूनच विलक्षण ओढ होती. अगदी शाळेत असल्यापासून पहाटे उठून मी काहीतरी वाचत बसलेला असे. त्यावेळी सोलापूरला आमच्या लहानशा त्या घरात अगदी पहाटे आमची आई रेडिओवर भक्तीगीत लावायची आणि चुलीवर चहा गरम होत असताना लता, आशा, माणिकबाई, सुमन कल्याणपूर, सुधीर फडके व इतरही अनेक गायक-गायिकांची गाणी मला ऐकायला मिळायची. मला गाण्याविषयी नेहमीच एक वाटत आलंय- विशेषतः सुगम संगीताविषयी- प्रत्येक गाण्याबरोबरच काही आठवणी (associations) जुळलेल्या असतात आणि आपल्याला जेव्हा ते गाणं आवडतं, तेव्हा त्या गाण्याबरोबरच त्या आठवणी, तो “माहोल” आपल्या डोळयांसमोर उभा रहातो आणि मग ते सगळं प्रकरण एकंदरीत आपल्याला आवडतं तरी किंवा कदाचित आवडतही नाही. म्हणूनच एकाला आवडणारं गाणं दुस-याला आवडेलच असं नसतं आणि



त्यामुळे त्या दोघांत कुणी जास्त बरोबर किंवा “श्रेष्ठ” ठरत नाही हे त्यामुळेच.

भल्या पहाटे ते आईचं प्रसन्नपणे घरात वावरणं, त्या गाण्यांबरोबरच स्वतःही गुणगुणनं हे अगदी अजून डोळयांसमोर आहे. आजही ती पहाटवेळची भक्तीगीतं ऐकली की तेच वातावरण डोळयांसमोर स्वच्छ उभं ठाकतं आणि मग ती गाणी मनात बराच वेळ गुणगुणत रहातात. त्यानंतरच्या शाळा कॉलेजच्या दिवसात मला सिनेमातली गाणी भारी आवडायची. सी. रामचंद्र, मदनमोहन आणि शंकर-जयकिशन हे माझे खूपच आवडते. मराठीत वसंत प्रभू, सुधीर फडके आणि श्रीनिवास खळे म्हणजे तर ग्रेटच! कॉलेजमधल्या एन.सी.सी. कॅम्पमध्ये रात्री शेकोटीपाशी म्हटलेली ती मदनमोहनची गाणी, शाळेतल्या त्या वेडगळ, काहीशा काल्पनिक आणि काहीशा त्या काळी उगाचंच ख-या वाटणा-या प्रेमातल्या अवस्थेत असताना सतत भुंग्यासारखी फिरणारी ती सी. रामचंद्राची गाणी आणि सहलीच्या वेळची ती शंकर-जयकिशनची



गाणी. ती गाणी ऐकली की मी अजून पुनः मनाने त्या सहलीला जातो !

अशाच एका अवचित वेळी श्रीराम पुजारी (पुजारी सर) आमच्या आयुष्यात आले. आमच्या घरी साहित्य, संगीत यांचं वेड कुणी लावलं असेल तर ते त्यांनीच. जगात जे जे चांगलं आहे, त्यावर प्रेम करायला शिकवलं ते त्यांनीच. अल्बेटो मारोव्हिया, डिकन्स, हार्डी, वुडहाऊस, लॉरेन्स, पु.ल. देशपांडे, अत्रे, करंदीकर, खानोलकर, बोरकर यांच्याचबरोबर मग कुमार गंधर्व, भीमसेन जोशी, रविशंकर यांच्यावरही जीव लावायला त्यांनीच शिकवलं. कित्येक कवी आमच्या घरी येत. कित्येक गायक रात्ररात्र बसून गप्पा मारुन  जात. त्या गप्पा ऐकताना या शास्त्रीय संगीतात काहीतरी “ग्रेट” आहे असं वाटायला नक्कीच लागलं होतं. पण ते प्रत्यक्ष ऐकताना तसं जाणवत मात्र नव्हतं. त्याची “किक” अजून बसली नव्हती आणि उगाचंच इतर त्याला “मोठं” म्हणतात म्हणून तसं आपणही म्हणायचं, हे मला मान्य नव्हतं. थोडक्यात काय तर गाणं अजून खरं भावलं नव्हतं, मनाला खोल कुठेतरी भिडलं नव्हतं. दिवसेंदिवस मनात पिंगा घालत नव्हतं. बैचेन करत नव्हतं!



माझी बहीण सुलभा खूपच हुशार! तिची भाषा सुंदर आणि तिचं गाणंही छान! त्याकाळी ती शिकत असे. मग भीमसेन, कुमार, जसराज असे कुणीही आले की, ती त्यांच्यासमोर गायची, शिकायची.. तिला गाणं पटकन समजायचं. मग वामनराव देशपांड्यासारखे तिला भल्या पहाटे शिकवायला यायचे. एकदा असंच सकाळी पाच किंवा सहा वाजता आमच्या घरी “उन संग लागे” ही

रामकलीतली चीज त्यांनी शिकवायला सुरुवात केल्याचंही आठवतंय. आमचा आणि या प्रसिध्द गवयांचा चांगलाच घरोबा होता. पुजारी सरांकडे तर या सगळयांची वस्तीच असायची. मग त्यांच्या गप्पांमध्ये आम्हीही लुडबुडायला जायचो. त्यांच्या घरी भीमसेन आणि कुमारांबरोबर तासनतास गप्पा ऐकल्याचं आठवतंय.




आपण काहीतरी विलक्षण मोठ्या माणसांमध्ये वावरतोय असं वाटून आपणच मोठं असल्यासारखं वाटायचं! शिवाय दुस-या दिवशी शाळेत मिरवायला एक छान कारणही मिळायचं! रात्री तीन वाजता असंच एकदा बिरजू महाराज आणि आम्ही दोन-चारजण यांच्यातल्या गप्पा आणि त्यानंतर त्यांनी गायिलेल्या मराठीतल्या गजला अजून मनावर कोरलेल्या आहेत. “जायचे असेल तरी नकळत निघून जा” हे मराठीतले शब्दही ते किती छान म्हणत! या सगळया “माहोल” मध्ये शास्त्रीय संगीत ऐकत गेलो, पण अजून ते “ग्रेट” का आहे हे मात्र कळत नव्हतं ते नव्हतंच! त्याकाळी 78 स्पीडच्या साडेतीन मीनिटांच्या रेकॉर्डस् मिळायच्या. भीमसेनांची शुध्द कल्याणमधील “बतिया दोरावत”, कुमारांची गौड मल्हामधली “न बताती तू पहचान”, धानीमधली “आई ऋत आई” आणि केसरबाईच्या अनेक रेकॉर्डस् आमच्याकडे आल्या आणि त्या अनेकदा ऐकल्यावर चक्क आवडायला लागल्या! त्याअगोदर शास्त्रीय संगीत म्हणजे तास-दीड तास

चालणारा कंटाळवाणा प्रकार असंच वाटायचं. पण या रेकॉर्डस् ऐकल्यानंतर चांगलीच आवड निर्माण झाली. म्हणजे इतकी की, कित्येक रेकॉर्डस् पुनःपुनः ऐकाव्याशा वाटायच्या. अगदी दरवेळी हाताने ते रेकॉर्ड प्लेअरचं हँडल फिरवावं लागलं तरीही! मग कुणी मैफिलीत गौड मल्हार गायला की, मनातल्या मनात “न बताती तू पहचान” आळवायचो आणि त्यात काही साम्य आहे ते बघायचो. असं करता करता ब-याच रागात साम्य काय आहे ते कळायला लागलं. प्रत्येक रागाचा “मूड” काय आहे, वातावरण काय आहे, हे मला जाणवायला लागलं. मग त्या रागातलं एखादं गाणं लागलं की मी ते चक्क ओळखायलाही लागलो. कित्येकदा चुकायचोही. पण ब-याचदा बरोबरही असायचो. निदान जवळचे तरी राग ओळखता येऊ लागले. म्हणजे “भूप”च्या ऐवजी क्वचित “देसकार” किंवा “शुध्द कल्याण” व्हायचा. “पुरिया कल्याण” ऐवजी “पुरिया धनश्री” व्हायचा. तरीही हा संध्याकाळचा कुठला तरी राग आहे, एवढं कळायला लागलं होतं आणि त्याचीही खूप मजा वाटायची. पण तरीही हे सगळं सांगायला गवयांना तास-दीड तास का लागतो, हा प्रश्न सुटायचा होताच!!



पुढे मी आय.आय.टी.त गेलो. तिथे तिस-या वर्षी आमचा आय.आय.टी., टी.आय.एफ.आर.सी. आणि बी.ए.आर.सी. इथल्या चक्क “टॉप”च्या इंजिनियर्सचा,

गणितज्ज्ञांचा आणि शास्त्रज्ञांचा असा विलक्षण ग्रुपच बनला. सगळेच आपापल्या क्षेत्रात “ग्रेट” होते. आम्हा सर्वांना वेगवेगळया गोष्टींत रस होता. आयुष्याचा अर्थ लावायला निघालो  होतो आम्ही! तो ख-या अर्थानं आमच्या आयुष्यातला “रेनायसांस” होता. मग त्यात तत्वज्ञान, साहित्य, अर्थशास्त्र आणि संगीत या सगळयाच गोष्टी होत्या. रात्रंदिवस अभ्यासापेक्षा त्या सगळया विषयातच आम्ही गर्क असायचो. रोज काहीतरी नवं वाचायचं, नवी चर्चा करायची आणि नवं ऐकायचंही! ती खरोखरंच एक धुंदी होती, बेहोषी होती!! आमच्यापैकी बऱ्याचजणांना शास्त्रीय संगीतात खूपच रस होता. त्यावेळी “स्वरांजली” नावाची संस्था स्थापन





करण्यामध्ये आमच्यापैकी काहींचा हातभार होता. स्वरांजलीतर्फे मग आम्ही अनेक गाण्यांचे कार्यक्रम केले. ते कलाकारांना जाऊन भेटणं, त्यांच्या घरी जाऊन गप्पा मारणं, त्यांच्याच घरी त्यांचंच गाणं ऐकणं, मग तो कार्यक्रम आखण्यातली धुंदी, प्रत्यक्ष कार्यक्रमाच्यावेळी ते पु.लंच्या “नारायण” सारखं सगळीकडे धावाधाव करणं आणि कार्यक्रम पार पडल्यावर येणारी ती पोकळी, ती विषण्णता अनुभवणं!! या सगळयातून जाता जाता गाण्याची आवड आणि ओढ वाढतच गेली. हरीप्रसाद, शिवकुमार, झाकीर, गंगुबाई, मन्सूर, रविशंकर, विलायतखाँ, कुमार, भीमसेन, जसराज हे सगळे त्याकाळात मनसोक्त ऐकले, त्यांच्याबरोबर गप्पाही झाल्या आणि मग व्हायचं तेच झालं! गाणं मनात पिंगा घालायला लागलं. एखाद्या गोष्टीनं पछाडणं म्हणजे काय, हे याच काळात कळलं. कुमारांनी गायलेलं भैरवीतलं “धून सुनके मनवा” हे भजन तर गाणं संपल्यानंतरही बराच काळ मला ऐकू येत होतं! अगदी काही दिवस उलटून गेल्यावरही! भैरवीतल्या त्या सगळं संपल्याच्या वातावरणानं तर मला इतकं पछाडलं की नंतर त्या मैफिलीच्या जागी जाऊन फक्त त्या रिकाम्या स्टेजकडे मी अनेकदा तासनतास विषण्णपणे बघत बसलोय! आणि मनात त्या मैफिलीच्या आठवणी आणि त्यांना बिलगलेले भैरवीचे सूर मनाचा ठाव सोडत नव्हते. जे भैरवीचं झालं तेच इतरही रागांचं. भीमसेनांची “मालकंस” मधली “पग लागन दे” ही चीज, किशोरी आमोणकरांची “बाजे झनन” ही जौनपुरीतली चीज, कुमारांची “सखी मन लागे ना” ही

बागेश्रीतली चीज, रविशंकर-अली अकबरांची “काफी पलासी” आणि “श्री” मधील जुगलबंदी, विलायत-बिस्मिलांची “चैती धुन” या सगळ्यांनी आमच्या मनाचा ताबाच घेतला.

अशा असंख्य रेकॉर्डस रात्रंदिवस कितीवेळा ऐकल्या असतील कोण जाणे! दरवेळी त्यात नवीनच काहीतरी सापडायचं! मग पुण्या-मुंबईतली जवळपास एकही मैफिल आम्ही सोडली नाही. रंगभवनमध्ये मैफल झाल्यावर रात्री व्हीटीच्या प्लॅटफॉर्मवर वर्तमानपत्र घालून झोपायचं आणि सकाळी पहिली लोकल पकडून कांजूरमार्गापासून आय.आय.टी.ला लाल आणि तर्र डोळ्यांनी परतायचं, हा नेहमीचाच कार्यक्रम होऊन बसला. मग प्रत्येक रागात डोकावणं सुरु झालं. “मालकंस” किंवा “बागेश्री” घ्यायचा आणि तो अनेक गायकांचा, वादकांचा ऐकायचा. वातावरण निर्मितीसाठी आम्ही संध्याकाळचे राग चक्क पवई लेकपाशी सूर्य मावळताना, किना-यापाशी बसून ऐकायचो. त्यातच मग भीमसेनांचा “पुरिया कल्याण”, अमीरखॉंचा “मारवा” आणि इतरही बरेच राग असायचे. आमच्यातल्या काहींनी मग भातखंडे वाचायला सुरुवात केली. काहींनी सतार शिकायला तर काहींनी कर्नाटक संगीतात लुडबुडण्याचं ठरवलं आणि आमचं आयुष्य संगीतमयच होऊन गेलं. अर्थातच हेमिंग्वे, स्टाईनबेक यांच्या कादंब-या, रसेल विटगेनस्टाईन आणि सार्त्र यांचं तत्वज्ञान, मार्क्स आणि केन्स यांचे अर्थसिध्दांत हेही तितकंच झिंग आणणारं होतंच. फक्त या सगळ्यात आय.आय.टी.च्या अभ्यासक्रमाची थोडीफार कटकट उगीचंच मध्येमध्ये असायची!! पण ते सोडलं तर बाकी सगळं कसं मस्त चाललं होतं!!

त्याच काळात आम्ही भीमसेनांचं गाणं केलं होतं. पावसाळ्याचे ते दिवस होते. भीमसेनांनी त्या दिवशी “करीम नाम तेरो” ही “मिया मल्हार” मधील चीज इतकी अफलातून गायली होती की, मैफिल एक वाजता संपल्यावरही मनामध्ये तो “मल्हार गडगडाट करतच





होता. मला काही केल्या झोप येईना आणि चैनही पडेना. शेवटी मी हॉस्टेलवरुन बाहेर पडलो. रात्रीचे तीन-एक वाजले होते. बाहेरही प्रचंड पाऊस कोसळत होता. डोंगरावरच्या अरुंद पायवाटेवरुन मी चिंब अवस्थेतच खाली कांजूरमार्ग स्टेशनवर येऊन ठेपलो. मग बाहेरच्या पावसापेक्षा आत कोसळणाऱ्या मल्हारनेच मला जास्त बैचेन केलं होतं. एक तासभर स्टेशनवरच येरझाऱ्या घालून मी पहिली लोकल पकडली आणि कल्याणला माझ्या मामाकडे येऊन थडकलो. त्याच्याकडे भीमसेनांची मियामल्हारमधली हीच चीज असलेली रेकॉर्ड होती, हे मला आठवत होतं. सकाळी साडेपाचला माझी वाजलेली बेल ऐकून मामाला काही विशेष वाटलं नाही. खरं तर मी गेल्या तीन-साडेतीन वर्षात त्याच्याकडे फारसा गेलेलो नव्हतो. पण मी विक्षिप्त आहे हे त्याला ठाऊक होतं! तोही मोठ्या मनाचा. त्याने सरळ दार उघडलं. मी त्याला त्याचा रेकॉर्ड प्लेअर आणि

मल्हारची “ती” रेकॉर्ड काढायला सांगितली. त्यानं ती शोधली पण मिळाली नाही. मग सकाळी नऊपर्यंत त्याच्या व्हरांड्यात अस्वस्थपणे येरझाऱ्या घालून, दुकानातून ती रेकॉर्ड विकत आणून ओळीनं तीनएक तास सातत्याने 8-10 वेळा ऐकली, तेव्हा कुठे “मल्हार” ने लावलेली ती “आग” शांत झाली!

एकदा याच काळात किशोरी आमोणकरांची मैफल दादरला होती. त्यांच्या “जौनपुरी” मुळे त्यांच्या गाण्याची ताकद मी ओळखून होतो. किशोरीताईंकडे सुलभा-माझी बहीण-काही काळ शिकत असल्याने माझं त्यांच्याकडे येणं-जाणंही होतंच. त्यांच्या घरी गेल्यावर मोगूबाईचं ते प्रसन्न हसणं, विचारपूस करणं अजून आठवतंय. त्यांच्या अशर मॅन्शनमधल्या वास्तव्यापासून ते पार्ल्यातल्या जयविजय आणि नंतर प्रभादेवीमधल्या वास्तव्यात माझं सतत येणं-जाणं किशोरीताईंकडे असायचं. त्यांच्याकडे गेलं की मग बऱ्याच गप्पा आणि काही वेळा गाणंही ऐकायला मिळायचं. त्यांचा आवाज लावण्याची ती पध्दत आणि त्याहीपेक्षा त्यांचं ते रागांचं संपूर्ण शिल्प आपल्यासमोर एखाद्या अत्यंत कुशल कारागीरासारखं उभं करणं याविषयी मला प्रचंड कुतूहल आणि आश्चर्य वाटत आलंय. मला कित्येक बैठकी आठवतायत की त्यांचा एखादा राग ऐकला की, त्या रागाच्या वातावरणात चिंब असताना त्यातून बरेच दिवस बाहेरच येताही येऊ



नये आणि यावंसं वाटूही नये! जे ललतपंचमचं, तेच कबीरभैरवचं, बहादुरी तोडीचं, विभासचं, भीमपलासचं, बसंती केदारचं, यमनचं किंवा कौशी कानडाचं! एखाद्या रागाचं यापेक्षा सुंदर आणि संपूर्ण चित्र कधीच कोणी निर्माण करु शकणार नाही, असं वाटण्यापर्यंत मजल जायची!

मला रागातलं पांडित्य फारसं कळलंच नाही. किंबहुना त्याची मला तशी गरजही भासली नाही. गाण्यावर मी फक्त प्रेम केलं आणि ते मात्र अतोनात, अपरंपार! प्रत्येक रागातल्या वेगवेगळया छटा शोधायच्या आणि त्या भावविश्वात बुडून जायचं हेच मग सुरु झालं. कुमारांची “यमन” मधली “बनू रे बलय्या” ही चीज ऐकल्यावर अनेक दिवस मनात ती गातच होतो. म्हणजे रोजचा दिनक्रम चालूच असायचा. पण मागे सतत तो “यमन” असायचाच! कित्येक वेळा आपण दुकानात आहोत की अन्य सार्वजनिक ठिकाणी वावरतोय, याचं भान न रहाता उगाचंच तोंडातून एखादी लकेर किंवा तान जायची आणि माझ्या मनातलं ते काहूर न कळल्यामुळे आजुबाजूचे लोक माझ्याकडे चमकून बघायला लागायचे.




असाच एक काळ बेगम अख्तरमय होता. त्या खणखणीत आवाजानं, त्या शब्द फेकण्याच्या पध्दतीनं आणि त्यातल्या “पॉज” नं मला

चक्क वेडच लावलं होतं. “बेगम अख्तर सिंग्ज गालिब” या रेकॉर्डची तर पारायणंच झाली. तिचं ते सिगरेट फुंकणं, व्हिस्कीचा प्याला हातात घेऊन, जीन्स घालून गजल म्हणण्याबद्दल खूप ऐकलं होतं. तिच्या एकूणच व्यक्तिमत्वाविषयी आणि गाण्याबद्दलही मला फारच आकर्षण होतं. मग प्रत्यक्ष गाठीभेटी झाल्या. आमच्याबरोबर विनोद मुवाई नावाचा एक टी.आय.एफ.आर. मधला शास्त्रज्ञ होता. तो अमेरिकेतील कॉर्नेल विद्यापीठात शिकवायचा. तो तेंव्हा कुलाब्याला राही. आमचाही अड्डा मग कुलाब्याला असायचा. रात्री-बेरात्री मग अनेक महिने-वर्षं सैगल, मास्टर मदन, मलिका पुखराज, शोभा गुर्टू यांचंच गाणं ऐकण्यात घालवल्याचं आठवतंय!

यानंतर आयुष्यानं अनेक वेडीवाकडी, बरी-वाईट वळणं घेतली. आदिवासींच्या सामाजिक चळवळीपासून ते कम्प्युटर्सच्या उद्योगात सी.ई.ओ. म्हणून बरीच वर्षं काम करेपर्यंत बऱ्याच भल्याबुऱ्या अनुभवांतून जाताना बरेचसे संदर्भ बदलले. पण गाण्याची साथ मात्र तशीच अक्षय राहिली. अनेक संकटातून किंवा बिकट प्रसंगाच्या धगीमधून जाताना काही गोष्टी किंवा काही माणसं दूर गेली, पण गाण्यानं मात्र प्रेमाचा, दिलाशाचा आणि आनंदाचा शिडकावा करणं काही सोडलं नाही! मनाला जखम झाल्यावर रागेश्री किंवा गोरख कल्याणच्या सुरांनी हळुवार, मायेनं फुंकर घालावी तसंच!



मला वाटतं, ते 1988 किंवा त्याच्या आसपासचं कुठलंस वर्ष असावं. एकदा कामानिमित्त मला अबुधाबीला जावं लागलं. तिथे बाजारपेठेला "सूक" असं म्हणतात. तिथे "सूक" मध्ये सहज फिरत असताना एका कॅसेटच्या दुकानात गेलो. मला फरिदा खान, इक्बाल बानू, हुसेन बक्ष, मलिका पुखराज, मेहेंदी हसन, गुलाम अली वगैरे आवडत. मी त्यांच्या कॅसेटस् मागितल्या. माझी आवड आणि दाढी या दोन्ही गोष्टींमुळे असेल कदाचित, पण तो मला पाकिस्तानी समजला! तो म्हणाला,"आपको मै लता मंगेशकर सुनाता हूँ" मी जरासा वैतागलोच. मी त्याला भारतीय असल्याचं सांगितलं आणि "तू मला लता काय ऐकवणार?" असंही खडसावलं! त्यानं मात्र हसत हसत "जसा सुनिए तो" असं म्हणत लताच्या जुन्या "कॅन्स्लड्" गाण्यांची कॅसेट लावली. त्यातली गाणी भन्नाटच होती.




त्यातला तिचा आवाज, तो दर्द, ती चाल.. सगळं अचाटच. मी आजवर कधीही न ऐकलेलं. त्यानं फास्ट फॉरवर्ड करुन दुसरं गाणं लावलं. तेही ग्रेट होतं. मग कॅसेट उलटी करुन लावली. तेही गाणं अफलातून होतं. मग त्यानं अजून एक तशातलीच कॅसेट लावली. तेही सगळं विलक्षण! अखेरीस मी शरणागती पत्करुन त्याला विचारलं,"अशा किती कॅसेटस् तुझ्याकडे आहेत?" तो म्हणाला,"सव्वीस". मी मुकाट्यानं त्यानं सांगितलेल्या किंमतीला कॅसेटस् विकत घेतल्या. "सुख" म्हणजे काय? याचा खरा अर्थ मला त्या दिवशी उमगला. नंतर कळलं की, 1956 सालाअगोदरची फारशी बाहेर न मिळणारी अशी ती दुर्मिळ गाणी होती. त्यात सज्जाद, अनिल विश्वास, श्यामसुंदर, सी.रामचंद्र अण्णा अशा अनेक ग्रेट संगीतकारांच्या रचना होत्या. आवाज मात्र फक्त लताचा

होता. त्या वेळी लता म्हणजे काय "प्रकरण" आहे, ते कळलं! आपण शास्त्रीय संगीत ऐकतो म्हणजे काहीतरी मोठ्ठ करतोय, आपण जरा वरचढच आहोत, असं मला मधनं मधनं उगीचंच वाटायचं. माझ्या या समजुतीला लतानं जबरदस्त हादरा दिला. गंमत म्हणजे त्यानंतर तीनएक वर्ष मी शास्त्रीय संगीत जवळपास ऐकलंच नाही. आयुष्य फक्त लतामयच होऊन गेलं.

माझा एक विचित्र स्वभाव आहे. कोणतीही उदात्त किंवा सौंदर्यपूर्ण गोष्ट मनाला भिडली की मी त्यात पूर्ण बुडून जातो. मग तो उदात्त विचार असो किंवा सुंदर कलाकृती असो, मी त्याच वातावरणात भारावून जाऊन बराच काळ वावरतो. डी.एच.लॉरेन्सची "सन्स अँड लव्हर्स" किंवा ग्रॅहम ग्रीनची "एन्ड ऑफ दी अफेअर" वाचल्यावर इंग्लंडमधल्या त्यात वर्णिलेल्या जागी जाऊन तासनतास त्या वातावरणात जाऊन भटकणं, "लस्ट फॉर लाईफ" वाचून व्हॅन गॉग या चित्रकाराच्या चित्रकलेनं आणि आयुष्यानंच भारावून जाऊन अमस्टर्डॅमला व्हॅन गॉग म्युझियममध्ये ते तासन तास तो काळ आठवत आठवत रेंगाळणं, अशा असंख्य पूर्ण वेडगळ गोष्टी मी ब-याचदा केल्यात.



आताही तसंच झालं. मी सगळया जुन्या संगीतकारांना भेटायला सुरुवात केली. सी. रामचंद्रांना पूर्वी भेटलो होतोच. सज्जादलाही दोनदा मग भेटलो. अनिलदांनाही आमचे मित्र सप्रे यांच्याकडे दोनदा भेटलो.. ती वर्ष फक्त जुनं सिनेसंगीत ऐकण्यातच गेली-जवळपास भ्रमिष्टासारखी. त्यातल्या "तुम क्या जानो, तुम्हारी याद मे", किंवा "वो तो चले गये ए दिल", किंवा "अच्छा होता जो दिल मे तू आया न होता", किंवा "ये दिल मचल मचल के यूं रोता है जारजार क्या", "तेरा दर्द दिल मे बसा लिया", किंवा "मै अपने दिलका अफसाना सुनाऊं फिर चले जाना" वगैरे गाणी ऐकून तर मला चक्क रडूच फुटायचं.



मला कुणी त्या काळी सांगितलं की अमुक अमुक गाणं फारच ग्रेट आहे, पण तू फक्त गिरगावातल्या अमुक अमुक पानवाल्याकडेच आणि रात्री अकरानंतर ऐकायला मिळतं, की आम्ही दुस-या दिवशी रात्री 11 वाजता त्या पानवाल्याच्या गादीवर हजर! एक मात्र झालं की, शास्त्रीय संगीत "ग्रेट" वाटतंच राहिलं, पण त्याविषयीचा वृथा अभिमान मात्र गळून पडला. कुठलंही संगीत जे मनाला भिडेल, भावेल, ऐकायला गोड वाटेल, तेच चांगलं-ही भूमिका घडत गेली!!! त्याचमुळे मग लावणी, गजल, कव्वाली, भावगीत, भक्तीगीत, यांचेही नंबर लागले. कर्नाटक संगीतही खूपच

ऐकलं, विशेषतः लालगुडी जयरामन, यू. श्रीनिवास, बालमुरलीकृष्णन्, बालचंदर वगैरे अनेक.




तसाच एक काळ फक्त मोत्झार्ट, बीथोवन, बाख आणि चॅकॉव्हस्की यांच्यात गेला. नेमके याच काळात सॉफ्टवेअरच्या कामासंदर्भात युरोप आणि अमेरिकेला मला अनेकदा जावं लागायचं. जर्मनीतून फ्रान्सला एक रेल्वे जाते. जाताना ती हॉलंड आणि बेल्जियम या देशांतून जाते. या गाडीने मी चाळीस-पन्नास वेळा तरी उलटसुलट प्रवास केला असेल. या प्रवासात बाहेर छान शेतं, गावं, शहरं दिसायची आणि वॉकमनवर सतत "बीथोवन"ची "फिफ्थ सिंफनी" किंवा "फ्यूर एलिझे" किंवा चॅकॉव्हस्कीचे "स्वान लेक" चालू असायचं. मला त्याही संगीतातलं व्याकरण फारसं कळलं नाही, पण त्यातलं वातावरण मला फारच मोहिनी घालायचं. मला त्यातलं पियानो, व्हायोलिन आणि फ्लूट यांचं वाजवणं, त्यांचे सूर आणि मिश्रण फार आवडायचं. अजूनही आवडतं!




मला आठवतंय, की अमस्टरडॅमला मी एकदा ब्राझिलियन रेस्टॉरंटमध्ये जेवायला गेलो होतो, तेंव्हा ब्राझिलचं संगीत ऐकायला मिळालं. मग तिथलंही संगीत जमवायला सुरुवात केली. असंच लंडनला एकदा आमच्या सॉफ्टवेअर इंजिनियर्संना घेऊन एका चिनी रेस्टॉरंटमध्ये गेलो असताना

तिथे चिनी संगीत ऐकायला मिळालं. मला ते संगीत खूप आवडलं. मग त्या हॉटेलवाल्याने माझा पत्ता घेऊन चक्क मला त्याची कॅसेटच पाठवून दिली. गंमतीची गोष्ट अशी जाणवली की जवळजवळ सगळं चिनी पारंपारिक संगीत आपल्या "भूप" रागाच्या जवळपास आहे. त्यानंतर सॅनफ्रान्सिस्कोतील एका चिनी मित्राकडे बसून रात्री बराच काळ चिनी संगीत ऐकून टेप करुन घेतल्याचंही आठवतंय!

गाण्याची असोशिएशन्स कशी असतात बघा, एकदा हॉंगकॉंगच्या समुद्रकिनारी बसलो असताना एक मुलगी मंद संगीताच्या पार्श्वभूमीवर सुंदर "सॉफ्ट" गाणी म्हणत होती. जपानमधून चांगली प्रोजेक्टस् मिळाल्यानेही असेल, पण मी खुशीतच होतो एवढं मात्र खरं. कदाचित यामुळेच की काय पण ते संगीत मला इतकं सूदिंग वाटलं की मी लगेच भराभर बरंच चिनी आणि जपानी संगीत जमा केलं. तो शांत समुद्र किनारा, लुकलुकणा-या दिव्यांमध्ये दूरदूर दिसणा-या बोटी, मंद वारा आणि या पार्श्वभूमीवरचा तो आवाज यांची धुंदी मी कधीच विसरणं शक्य नाही!



मग मी भराभर जगातल्या वेगवेगळया देशातलं संगीत ऐकण्याचा आणि जमवण्याचा सपाटाच सुरु

केला. युरोप, जपान, अमेरिका, आफ्रिका, आशिया, ऑस्ट्रेलिया इथल्या ज्या ज्या देशात मी जायचो, तिथलं संगीत मग मी जमवायचो. गंमत म्हणजे न्यूयॉर्कच्या मॅनहटनमधल्या रस्त्यांवरच्या दुकानात लॅटिन अमेरिका, आफ्रिका इथलं संगीत मुबलक प्रमाणात मिळतं. तिथे ऐकून खरेदी करायलाही मजा यायची. ते ऐकताना त्या त्या देशातल्या संस्कृतीची, इतिहासाची आठवण येते आणि मग तो एक सर्वंकष अनुभवाचाच भाग होऊन बसतो. मग ते बीटल्स असोत किंवा आफ्रिकन ब्लूज असोत!

1990 च्या जवळचं ते कुठलंस वर्ष असावं. पत्रकार अशोक जैनांचा मला फोन आला. "पटणी"मधील सतीश जोशीने अशोकला माझ्या संगीताच्या वेडाविषयी सांगितलं होतं. अशोकला "महाराष्ट्र टाईम्स"मध्ये गाण्यावर लिहायला कुणीतरी हवंच होतं. "मी गाण्यातला पंडित किंवा व्याकरणतज्ज्ञ नाही" मी अशोकला सरळच सांगून टाकलं. पण अशोकलाही कुणीतरी वेगळ्या पध्दतीनं लिहिणारं हवं होतं. मग माझा "क कॅसेटचा" हा स्तंभ सुरु झाला. बाजारात नवीन आलेल्या कॅसेटस् चा "रिव्ह्यू" करायला मी सुरुवात केली. प्रत्येक लेखासाठी मी दर शनिवारी नरिमन पॉईटच्या एन.सी.पी.ए.मधल्या वाचनालयात जाई. कलाकार, राग, वाद्य, घराणी यांच्याविषयी तासनतास अनेक पुस्तकं वाचायचो. प्रत्येक लेख माहितीपूर्ण आणि तरीही रंजक आणि वाचनीय असला पाहिजे असा माझा कटाक्ष असायचा. माझा हा प्रयत्न कित्येकांना खूपच आवडला. मला मात्र



त्यात ब-याच त्रुटी आढळायच्च्या!

आज या सगळयांकडे वळून बघताना खूपच गंमत वाटते. मला गाण्यातल्या पंडितापेक्षा गाण्यावर प्रेम करणारेच नेहमी जवळचे वाटत आले आहेत. पण या "शो"बाजीच्या जगात जो-तो दुस-याला "इंप्रेस" करायला बघतोय. कुठल्याही कम्प्युटरच्या माणसाशी बोला, तो त्यातलं जॉर्गन वापरुन तुम्हाला पहिल्यांदा घाबरवूनच सोडेल!! डॉक्टरांच्या भाषेचं तर विचारुच नका. अकौंटंट मंडळींनीही त्यांचाच कित्ता गिरवलाय! हे सगळं ठीक आहे हो, पण हे जार्गन गाण्यात-विशेषतः श्रोत्यांना कशाला हवंय, हेच कळत नाही. पण तरीही गाण्यावरच्या लिखाणात बरंच पांडित्य किंवा व्याकरण असलं की काही लोक त्या लिखाणाकडे (ते न कळल्यानं) आदरानं बघायला लागतात आणि इतर बरेचजण ही नसती पीडा नको म्हणून त्यापासून दूरच पळतात!!

यात आणखी भर घालतात ते गवई लोक. उगीचंच दीड-दोन तास एखादा राग गाऊन लोकांना ब-यापैकी "बोअर" करतात!! "अरे! अमुक अमुक गवई अमुक अमुक राग अडीच तास काय गायलाय!" अशा गप्पाही मी ऐकलेल्या आहेत. एकेकाळी मारलेल्याही आहेत. त्यातून मग गवयांचे माझा आवाज खर्जात किती खाली जातो बघा (की मग लोकांच्या टाळया), तो किती वर जातो बघा



(की मग लोकांच्या टाळया), तो किती वर जातो बघा (पुन्हा टाळया), वर उगाच एक सूर धरुन बराच काळ ताणून धरला की पुन्हा टाळया वगैरे. मग बऱ्यापैकी सौंदर्यमारक प्रकार चालू होतात. आपण ही "नाटकं" केली नाहीत तर टाळया मिळणार नाहीत म्हणून मग गवईही मग तेच करत बसतात आणि मग या सगळया गदारोळात गाणं हे कशासाठी आहे, हेच आपण विसरायला लागतो. "अहो, गाणं हे आनंदासाठी आहे, कसरतीसाठी नाही. कसरती करण्यासाठी इतर अनेक खेळ आहेत". कुणी जर मला विचारलं की,"आम्हाला गाणं समजत नाही हो, काय ऐकू?" मी सांगतो,"पलुस्करांचे तीन-तीन मीनिटांचे राग रोज सकाळ, संध्याकाळ ऐकावेत. असं एक महिना केल्यानंतर जर काही फरक न पडल्यास, काहीही कमीपणा न वाटून घेता पाहिजे ते संगीत ऐकावं" माझा हा डॉक्टरांसारखा सल्ला बऱ्याच "संगीतरुग्णां"ना लागू पडलाय. कारण त्या तीन मीनिटात पलुस्कर त्यांच्या त्या निर्मळ आवाजात प्रत्येक रागाची किती सुंदर मूर्ती उभी करतात!

मला आणखी एक आश्चर्य वाटतं, ते हे की आनंद घेण्याच्या या सुंदर गोष्टींमध्येही आता पैसा, प्रतिष्ठा, प्रसिध्दी आणि तत्सम गोष्टींनी धुडगूस घातलाय. अगदी यथातथाच गाणारी मंडळीही "मीडिया" बरोबर "मॅन्युपूलेट" करुन स्वतःला "मोठी" असल्याचं भासवतात आणि मग जरा पोशाखात, झिपऱ्यात आणि वागणुकीत वेगळेपणा किंवा थोडाफार विचित्रपणा केला, काही वेळा "पेज थ्री" वर फोटो, टीव्हीवर काही मुलाखती झाल्या की लोकांनाही तो खरोखरंच मोठा कलाकार आहे असं वाटायला लागतं. मग लोक त्याच्या कार्यक्रमांना गर्दी करतात. त्याच्या कॅसेटस् विकत घेतात. आणि एकदा हे झालं की त्यांच्या कार्यक्रमांना स्पॉन्सर्स मिळतात. म्हणजे पुन्हा त्यांचे कार्यक्रम जास्त होतात आणि

त्यांना जास्त प्रसिध्दी मिळते. हे दुष्टचक्र मोडायचं कसं? या पैशाच्या आणि प्रसिध्दीच्या झगमगत्या जगात कुठेतरी संथपणे, सहजतेने आणि तन्मयतेने गात असलेल्यांकडे लक्ष कोण देणार?

यावरुन एक आठवलं- आदिवासींमध्ये शहाद्याला असताना लोकगीतं ऐकायला मिळाली होती. नेहमी असं वाटायचं की, ज्या लोकगीतांवरुन बरेच राग आहे आहेत, त्या प्रत्यक्ष "लोकांची" आज काय अवस्था आहे? एकदा आठवतंय की बाहेरुन शहाद्याला एक भजनी गट आला होता. रात्रीचे दोन वाजले होते. त्यात एक मालकंसमधलं, तर एक मांडमधलं भजन होतं. त्याची चाल आणि त्याचा तो आवाज इतका अफलातून होता की रात्रीच्या त्या शांततेला कापून तो दूरदूरच्या झोपड्यांपर्यंत आणि डोंगरापर्यंत जात होता. यानंतर हा जथ्था कुठं जाईल? ही मंडळी कसं पोट भरत असतील? तीस वर्षांनी हा गायक कुठे असेल? याला लगेच "मीडिया"नं उचलंल असतं तर तो कसा रातोरात हीरो बनला असता..वगैरे विचारांनी काहूर माजलं आणि असंच एकदा पंधरा-एक वर्षांपूर्वी दुर्गापूर स्टेशनबाहेर एक आंधळा "तोडी"तलं एक भजन गात बसला होता. त्याच्या आवाजानं, सुरांनी, खरं तर भल्या भल्या गायकांची बोबडी वळवली असती! पण आजही बहुदा तसाच चार-आठ आण्यांसाठी तो आंधळा स्टेशनबाहेर म्हातारपणीही कांपलेल्या आवाजात गात असेल! हे सगळं कसं बदलायचं? गरीब-श्रीमंत दरीमुळे जसे कित्येक झोपड्यांमध्ये, गावांमध्ये हजारो आईनस्टाईन आज भीक मागताहेत, गुरं हाकताहेत तसेच कित्येक रविशंकर आणि भीमसेन यांच्या



नशिबी फक्त दुःखच आलंय आणि त्यांचं आयुष्यच बेसूर झालंय! त्यांचं काय करायचं? त्यांच्या आयुष्यात आनंदाच्या बागा केंव्हा फुलणार?

आजपर्यंत मला जे भावलं, ज्यांनी मला झपाटून टाकलं -अगदी माणसांपासून ते त्यांनी पेश केलेल्या कलाकृतींनी- ते ते सर्व सांगण्याची एक नैसर्गिक उर्मी दडपून टाकणं शक्यच नव्हतं! त्याच सगळ्या भावविश्वाचा हा ओझरता उल्लेख या मनोगताच्या निमित्तानं मी केला आहे. अगदी प्रामाणिकपणे सांगायचं तर कुठलाही आव न आणता किंवा कुठलीही पूर्वग्रहनियोजित अशी भूमिका न घेता मी आत्तापर्यंत या नादब्रह्माचा आस्वाद घेत आलो आहे. संगीताच्या क्षेत्रातली वर्गरचना, उच्च-नीचता मला कधीच मान्य नव्हती. जे जे मनाला भीडलं, त्या त्या क्षेत्रातली मुशाफिरी मी मुक्तपणाने केली.

प्रत्येक रागाला एक भाविवश्व असतं. ते जसं आम्हाला दिसलं ते इतरांनाही सांगावसं वाटलं,"अरे! बघ यात किती सौंदर्य आहे ते! आम्हाला ऐकून असं वाटलं. तुला कसं वाटलं? आणि या रागातली ही गाणी बघ, काही साम्य वाटतंय का ते ". जर हे वाचून काही ऐकावसं वाटलं तर खूपच धमाल येईल. यामागे काहीच पांडित्य नव्हतं आणि नाही. खरं तर चौफेर आणि बेधुंद गाणं ऐकण्याची जी मस्ती आणि नशा आहे तीच अजून उतरायची आहे. तर मग काय करायचं?



## संगीत ऐकणं आणि कळणं

**रणजित पवार**

"मला आवडेल ते संगीत ऐकायला; पण कळणार नाही, अशी भीती वाटते." नवीन प्रकारचं संगीत ऐकण्याची वेळ आली, लोक बिचकतात आणि हे कारण सांगतात. मग ते शास्त्रीय संगीत असो की विदेशातलं असो. पण संगीताचा आस्वाद घेण्यासाठी ते 'कळायला हवं' असं खरंच




काही असतं का? या प्रश्नाचं उत्तर कुठलाही अस्सल संगीतकार ठणठणीतपणे "नाही" असंच देईल. मात्र संगीतकलेमागची तत्त्वं मांडू बघणाऱ्यांना हाच प्रश्न केला, तर नव्या प्रकारच्या संगीताचा आस्वाद घेण्याची क्षमता प्राप्त होण्यासाठी त्या संगीताचं आकलन किंवा त्या संगीताच्या पार्श्वभूमीची थोडी माहिती असणं कसं आवश्यक आहे, हे ते पटवून देऊ लागतील. म्हणूनच या दोन्ही बाजू समोर आणणं महत्त्वाचं आहे. शास्त्रीय संगीताचं उदाहरण घेऊ. याची ओळख होते, ती बहुधा

कुठल्याशा मैफिलीत. तिथे येणारे बहुतेक श्रोते धीरगंभीर दिसतात. आपला सोबतीसुद्धा गाणं ऐकताना शाळेच्या वर्गातल्या विद्यार्थ्याचा एकाग्रचित्त भाव मोठ्या कौतुकाने चेहऱ्यावर घेऊन बसतो.

त्या गाण्याची ओळख करून घ्यायला आलेल्या बिचाऱ्या नवागताला याचं भलतंच टेन्शन येतं. एखादाच असतो नशीबवान की रेल्वेच्या प्रवासात खिडकीबाहेरचे देखावे फास्ट फॉरवर्ड होत असताना किंवा समुद्रकिनाऱ्यावर पाय मोकळे करताना अचानक स्वत:च्याच रेडिओवर किंवा स्टीरिओवर कुमार गंधर्वांच्या आवाजातलं निर्गुणी भजन कानावर पडतं आणि त्यातला शांत भाव चित्ताला असा वेढून टाकतो की स्वत:चीच ओळख विसरायला होतं; ऐकणारा स्वत:च्याच अंतरंगात असा शिरतो की जिथले प्रदेश त्याचे त्यालाच माहीत नसतात. हे असं होतं, तेव्हा त्या संगीताला आस्वाद घेण्यासाठी कोणाच्या मार्गदर्शनाची, समजावून सांगण्याची गरज मुळीच भासत नाही.
त्यातल्या सौंदर्याचं स्थान भौतिक नियमांप्रमाणे निर्विवाद असतं आणि स्वत:च्या अस्तित्वाच्या जाणिवेने भान भरून जात असताना तुमच्या आस्वादाच्या आड, ते संगीत समजण्याच्या आड काही म्हणजे काहीही येत नाही. पण मग संगीत शास्त्रीय असतं, म्हणजे नेमकं काय असतं? प्रथम शास्त्रीय संगीताचा उगम लोकसंगीतातून झाला आहे, हे लक्षात घ्यायला हवं. कुमार गंधर्वांसारख्या महान कलाकाराला स्फूर्ती देणारं लोकसंगीत



म्हणजे सामाजिक आणि वैयक्तिक व्यवहारातल्या सर्वसामान्य अनुभवांपासून अद्भुत अनुभूतीपर्यंत सारं वर्णन करण्याचं एक विशुद्ध

माध्यम असतं. परंतु या आविष्कारातले अर्थपूर्ण पैलू नेमके पकडता यावेत यासाठी काही तरी चौकट उपलब्ध असावी लागते. त्या चौकटीत अर्थातच काही मोजमापं, काही ताल, अभिव्यक्तीच्या काही विशिष्ट पद्धती यांची आवश्यकता असते.



या चौकटीमुळे कलेच्या सादरीकरणात एका बाजूने ठरीव रस्ते तयार होतात, तर त्याच वेळी काही आव्हानंही उभी रहातात. तुलना करायचीच तर क्रिकेटसारख्या लोकप्रिय खेळाशी करता येईल! या खेळातही काही नियम असतात, जे सर्व देशांमधल्या सर्व मैदानांमध्ये होणाऱ्या सर्व स्पर्धांच्यात सारखेच असतात. या बंधनांमुळे खेळाडूच्या प्रतिभेच्या आविष्काराचं मोजमाप करायला आधार निर्माण होतो. त्याच वेळी प्रेक्षकाच्या मनात आपोआप काही अपेक्षा उत्पन्न होतात ज्यांच्यामुळे खेळाच्या आस्वादातली खुमारी वाढते. अगदी याचप्रमाणे शास्त्रीय संगीतातही एखाद्या रागाच्या वा तालाच्या संदर्भात काही ढोबळ नियम घालून दिलेले असतात, ज्यांच्यामुळे कलावंतासाठी एक संदर्भचौकट तयार होते आणि श्रोते काही विशिष्ट अपेक्षा बाळगून ऐकू लागतात. काळ जात रहातो आणि या नियमांमधून, मार्गदर्शक तत्त्वांमधून समृद्ध परंपरा आकाराला येतात. शास्त्रीय संगीतापासून रॉक म्युझिकपर्यंत सर्व प्रकारच्या संगीतात परंपरा आकार घेतात, त्या याच पद्धतीने.



परंपरा पाळत थोर संगीत तयार करणाऱ्यांसाठी त्या परंपराही थोरच असतात. पण ते संगीत अमुक परंपरा पाळतं की पाळत नाही, याच्याशी श्रोत्याला काहीच देणंघेणं नसतं. त्याचा संबंध असतो त्याच्या स्वत:च्या अभिरूचीचं आणि भावभावनांचं प्रतिबिंब त्या संगीतात कसं पडलं आहे, याच्याशी. वेगवेगळया प्रकारचं संगीत ऐकण्याने बिघडत काहीच नसतं. कळणार नाही असं म्हणत बिचकण्याबरोबर वेगळं संगीत न ऐकण्यासाठी लोक आणखी एक कारण देतात, ते म्हणजे सांस्कृतिक परकेपणाचं. खरी गोष्ट अशी आहे की दुसरी कुठलीही कला संगीताप्रमाणे सर्व सीमा ओलांडून जात नाही. पौर्वात्य आणि पाश्चिमात्य जगतांनी एकमेकांच्या संगीताचा स्वीकार तर केला आहेच; शिवाय एके काळी जगावेगळया मानल्या गेलेल्या संगीतालाही आता मुख्य धारेत मान्यता मिळू लागली आहे. यातून हेच सिद्ध होतं की संगीत आणि श्रोता यांच्या मध्ये भाषा, सांस्कृतिक परंपरा, काही काही उभं राहू शकत नाही.



निसर्गात घडणाऱ्या घटनांचं विश्लेषण करून त्यांच्या मागची कारणमीमांसा सांगणे, म्हणजे शास्त्र. संगीताचंही तसंच आहे. विविध ध्वनी, सुरावटी, ताल मनाला का वेधून घेतात, याचा अर्थ शोधण्यातून संगीताच्या परंपरा तयार झाल्या. त्या अर्थाला शिस्त लावल्याने अनेकांना ते संगीत आत्मसात करणं शक्य झालं, परंपरेत विविध प्रवाह निर्माण होऊन संगीत समृद्ध झालं. संगीताचं हे शास्त्र शिकावं की शिकू नये, हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे; पण समजावून

घ्यायचंच नाही या हट्टाचा आणि न समजण्याचा काही संबंध नाही. संगीताच्या सौंदर्यातच त्याचा अर्थ लपलेला आहे. इंद्रधनुष्य का पडतं, हे सांगण्याचं काम लोलक करतो;पण इंद्रधनुष्य कसं असतं हे कळण्यासाठी ते असताना आकाशाकडे नजर केली तरी पुरते. संगीतातल्या तत्त्वांचा अभ्यास जरूर करावा; पण संगीताचा खरा अर्थ समजून घ्यायचा असेल, तर जे ऐकण्याचा प्रयत्न अगोदर कधीही केलेला नाही, त्या वेगळ्या संगीताच्या वाटेला जाण्याची तयारी ठेवलीच पाहिजे.

- रणजीत पवार --maayboli

http://www.maayboli.com/node/19086



# गृहपाठ

पहिल्या भागाचा अभ्यास

पु ल देशपांडे यांचं गुण गाईन आवडी आणि अच्युत गोडबोले यांचं नादवेध ही पुस्तकं संग्रही ठेवून वाचावीत.

पहिला आठवडा : राग केदार
खालील लिंक्स डाऊनलोड करून किमान ५ ते ६ वेळा ऐकाव्या

# राग केदार

केदार अनेक नवीन गायक
http://www.youtube.com/watch?v=LFysp6pEMtg

केदार : परितोष पोहनकर : कान्हा रे नंद नंदन
http://www.youtube.com/watch?v=1uKAvYrvjm0&NR=1

केदार : कान्हा रे : नवीन गायक
http://www.youtube.com/watch?v=atypjRzqoHg&feature=related

केदार : किशोरी आमोणकर
http://www.youtube.com/watch?v=jPwvRmdFUFg&feature=related

केदार : राशिद खान

http://www.youtube.com/watch?v=zM72xAO6Sec&feature=related

---

केदार : पंडित जसराज :

http://www.youtube.com/watch?v=4tPP74pWzdA&feature=related

केदार, तराना, : इंद्राणी मुखर्जी

http://www.youtube.com/watch?v=THnP6xKmMBM

केदार : भीमसेन जोशी : मध्यलय : सोहे लरायी

http://www.youtube.com/watch?v=PZt6662BcF4&feature=related

केदार : भीमसेन जोशी : द्रुत लय : सावनकी बुंदनिया

http://www.youtube.com/watch?v=qZlgmfJJdjQ&NR=1

kedar : शिवकुमार शर्मा : संतूर

http://www.youtube.com/watch?v=KXPaiPU2GJc

केदार : लता : हमको मनकी

http://www.youtube.com/watch?v=NbchuCfqBls

केदार हेमंत कुमार : दर्शन दो घनश्याम

http://www.youtube.com/watch?v=0UYtyMXwEuo

महंमद रफ़ी आशा : आप युंही अगर हमको मिलते

http://www.youtube.com/watch?v=dI-nQ3WKDPc

केदार : रफ़ी

http://www.youtube.com/watch?v=iJ6bcN2J2-c

http://www.youtube.com/watch?v=Wg9iGxkAsG8&feature=related

केदार : भीमसेन जोशी : विलंबित

http://vimeo.com/16041583

केदार : बडे गुलाम अली खां

http://www.youtube.com/watch?v=NbyzCaJRvxw

केदार : सुषमिता दास  विलंबित

आलाप.

http://www.youtube.com/watch?v=Cu2nshvYPiM&feature=related

**आठवडा दुसरा**

खालील लिंक्स डाऊनलोड करून किमान ५ ते ६ वेळा परत परत ऐकाव्या

# राग देस

राग देस : दूरदर्शन व्हिडिओ : नृत्य प्रकार

http://www.youtube.com/watch?v=tW_q5HJ60tc

राग देस : दूरदर्शन व्हिडिओ : वाद्य प्रकार

http://www.youtube.com/watch?v=3H_lmQMHj6E&feature=related

राग देस : बासरी : आकाश

http://www.youtube.com/watch?v=d4icJtswiss&NR=1&feature=fvwp

राग देश : नवीन गायक

http://www.youtube.com/watch?v=rNXsnr1poDE&feature=related

राग देस : फ़रिदा खानुम : अबके सावन घर आजा

http://www.youtube.com/watch?v=yrYRxEWug0I

राग देस : राशिद खान : नादान जियरा गुम गयो रे

http://www.youtube.com/watch?v=6sT3DJsUIzo&feature=related

राग देश : राशिद खान : ठुमरी : मोरा सैंया बुलाये आधी रातको नदिया बैरी भयी

http://www.youtube.com/watch?v=dKs892IqvZQ&feature=related

राग देस : संजीव अभ्यंकर : नैंनन में छबी छाये सजन

http://www.youtube.com/watch?v=PHqy01JbdJY

राग देस : संजीव अभ्यंकर : नैंनन में छबी छाये सजन :भाग २

http://www.youtube.com/watch?v=Iz7Yx8KDFLE&NR=1

राग देस : लता : तकदीर का फ़साना

http://www.youtube.com/watch?v=0vB-RGEb2aQ

राग देस : रफ़ी : तकदीर का फ़साना

http://www.youtube.com/watch?v=X7UOXUCb38o&feature=related

राग देस : लता : अजि रूठकर अब कहां जाइयेगा

http://www.youtube.com/watch?v=v87vDPpCIwE

राग देस : मन्ना डे : फ़िर कहीं कोई फ़ूल खिला

http://www.youtube.com/watch?v=RcWK3RYi3jU

http://www.youtube.com/watch?v=JbMJieHdR1o

राग देस : वंदे मातरम : भीमसेन जोशी

http://www.youtube.com/watch?v=9AIRAsoiRUg&feature=related

प्रथम भाग इथेच संपतो.

दुसऱ्या भागात :

स्वर, अलंकार, आलाप, ताना, गमक (या साठी कुठून तरी एखादी हार्मोनियम किंवा सिंथेसायझर मिळवा)

तिसऱ्या भागात

राग, थाट

चौथ्या भागात

ताल, लय, ठेका

पाचव्या भागात

ख्याल, ठुमरी, ध्रुपद,  जाती, प्रबंध, होरी, चैती, कजरी, लोकसंगीत

सहाव्या भागात

घराणी, संगीतकार, तानसेन ते भीमसेन.

साहित्य प्रतिष्ठान

मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांना इंटरनेटवर मानाचे स्थान असावे या उद्देशाने अनेक संस्था आणि व्यक्ती आज काम करत आहेत. ई साहित्य प्रतिष्ठान त्यातलीच एक. नेटाक्षरी हे कवितांचे ई साप्ताहिक, ई स्टाप हे विनोदाला वाहिलेले ई नियतकालिक, दुर्ग दुर्गट भारी ही महाराष्ट्रातील दुर्ग किल्ल्यांची माहिती देणाऱ्या ई पुस्तिकांची मालिका, स्वरनेटाक्षरी हे मराठीतले पहिले ऑडिओ ई नियतकालिक, मराठी कसे लिहावे, ई पुस्तक कसे बनवावे आदी ई लर्निंगची साधने, बालनेटाक्षरी हे मुलांसाठी नियतकालिक आणि आजवर प्रसिद्ध झालेली अनेक ई पुस्तके अशा आजवरच्या सुमारे दिडशे प्रकाशनांचा पल्ला ई साहित्य प्रतिष्ठानने गाठला आहे. सुमारे नव्वद हजार वाचकांपर्यंत ही प्रकाशने पोहचतात.



संगीत कानसेन हा सहा भागांच्या ई लर्निंगचा प्रवास खास भारतीय शास्त्रीय संगीताची ओळख मराठीतून करून देण्याचा प्रयत्न आपल्याला कसा वाटला ते कळवा. तसेच ई साहित्य प्रतिष्ठान ची इतर प्रकाशने विनामूल्य मिळण्यासाठी लिहा व भेट द्या.

नवीन प्रकाशने नियमित मिळण्यासाठी
esahity@gmail.com

आजवरची प्रकाशने वाचण्यासाठी
www.esahity.com